PRESENTED TO

KANARA SARASWAT MAHILA SAMAJ

In Memory of

Late Mrs. UMABAI KULKARNI

# MÂLATÎ MÂDHAVA

## A SANSKRIT DRAMA.

TRANSLATED INTO MARATHI

BY

**KRISHNA SHÂSTRÎ RÂJVÂDE,**

AND

REVISED AND CORRECTED

BY

**KRISHNA SHÂSTRÎ CHIPLUNKAR.**

Bombay:

MANORANJAK GRANTHA PRASARAK MANDALI.

1907.

गृहं तु गृहिणीहीनं कांतारादतिरिच्यते ।

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक २४ वें.

# मालतीमाधव नाटक.

[ संस्कृत नाटकाचें भाषांतर. ]

प. वा. श्रीयुत कृष्णशास्त्री राजवाडे

यांनीं लिहिलें.

[ द्वितीयावृत्ति. ]

---

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव-मुंबई.

---

किंमत ०-८-०. ]

[ जानेवारी, १९०७.

## प्रकाशकांचे दोन शब्द.

प्रकृत पुस्तक, परलोकवासी श्रीयुत कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं तयार केलेल्या व परलोकवासी श्रीयुत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं तपासून शुद्ध केलेल्या संस्कृत 'मालतीमाधव' नाटकाच्या भाषांतराची द्वितीयावृत्ति आहे. सुमारें ४५ वर्षांपूर्वी, ह्मणजे इ. स. १८६१ सालीं, ह्याची १ ली आवृत्ति प्रसिद्ध झाली होती. सांप्रत हें पुस्तक बहुतेक दुर्मिळच झालें होतें. महाकवि भवभूति ह्याच्या सुरस नाटकाची ही मराठी प्रतिकृति महाराष्ट्र वाचकांच्या दृष्टीआड होऊं नये, ह्मणून आज मुद्दाम प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

१८६१ झालीं प्रसिद्ध झालेल्या पहिल्या आवृत्तींत आणि ह्या आवृत्तींत पुढीलप्रमाणें थोडासा फेरफार केला आहे. मूळांतील अर्थ कायम ठेवून कित्येक ठेकाणीं असलेली संदिग्ध वाक्यरचना आणि दूरान्वय कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. देतां आले तेथें निरनिराळे प्रवेश दिले आहेत, व दुसरेहि असेच कित्येक किरकोळ फेरफार आणि आवश्यक वाटल्या त्या सुधारणा केल्या आहेत.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीचें कार्यालय,
गिरगांव, मुंबई;
१, जानेवारी, १९०७.

काशीनाथ रघुनाथ मित्र.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

प्राचीन काळीं संस्कृत भाषेंत काव्यें करणारे जे अनेक महाकवि होऊन गेले, त्यांमध्यें भवभूति नामक कवि अत्यंत प्रख्यात आहे. दंतकथा अशी आहे कीं, कालिदास व भवभूति हे दोघे एककालीं होते, व काव्य करण्याच्या गुणाविषयीं त्यांची एकमेकांशीं मोठी स्पर्धा असे. तसेंच अशीहि दंतकथा आहे कीं, कालिदाससुद्धां असें कबूल करी कीं, उत्तररामचरित्र नामक नाटकामध्यें भवभूतीनें माझ्याहिपेक्षां विशेष कविताशक्ति प्रकट केली आहे. असो. ह्या दंतकथांवरून इतकें तरी निदान सिद्ध होतें कीं, भवभूतीची कीर्ति संस्कृत जाणणाऱ्या विद्वान् लोकांत पराकाष्ठेची होती. तसेंच संस्कृत काव्यांतल्या दोषगुणांचें विवेचन करणाऱ्या मम्मटभट्ट,अप्पय्य दीक्षित,जगन्नाथराय इत्यादि अति सहृदय ग्रंथकारांच्या ग्रंथांवरूनहि भवभूतीची योग्यता मोठी दिसून येते.

भवभूतीच्या नांवानें मोडणारे पुढील तीन ग्रंथ प्रसिद्ध आहेत. महावीरचरित, उत्तररामचरित, आणि मालतीमाधव. हे तीनहि ग्रंथ नाटकरूप आहेत. त्यांपैकीं तिसऱ्याचें ह्मणजे 'मालतीमाधव' नाटकाचें मराठी भाषांतर करून विद्वज्जनांस हल्लीं सादर केलें आहे.

"प्रकृत भाषांतरांत मूळग्रंथाचा शब्दशः तरजुमा केला आहे असें नाहीं. तथापि, मराठी भाषेची रीत राखून, व पद्यरचनेचे नियम न सुटतां, जितका मूळाचा अर्थ आला, तितका आणला आहे; व मुळांतला मार्मिक व मुख्य अर्थ प्रायः सोडला नाहीं. संस्कृत भाषेंतली बोलण्याची रीत ठरलेली असल्यामुळें त्या भाषेंत थोड्या शब्दांनीं जो अर्थ दाखवितां येतो, तोच अर्थ मराठींत सुबोध करण्यास अधिक शब्द योजावे लागतात. अशा कारणानें कित्येक ठिकाणीं प्राकृत भाषांतरांत मुळांतल्यापेक्षां विशेष अर्थ आलासा भासेल."

कृष्णशास्त्री चिपळूणकर.

# मालतीमाधव नाटकांतील कथानकाचा सारांश.

पूर्वीं भूरिवसु आणि देवरात ह्या नांवांचे दोघे विद्यार्थी राजनीतीचा अभ्यास करण्याकरितां एका गुरूजवळ राहिले होते. त्याच शाळेंत कामंदकी नांवाची एक कुमारी विद्याभ्यास करित असे. शाळेंत असतांना भूरिवसु व देवरात ह्यांचा फार स्नेह जमून आला व आपणांस मुलगा आणि मुलगी अशीं अपत्यें झालीं तर त्यांचा परस्परांशीं विवाह करूं, असा त्यांनीं संकेत केला व हा संकेत कामंदकीसमक्ष झाला होता.

पुढें तीं सर्व मोठीं झाल्यावर भूरिवसु पद्मावती नगरीच्या राजाचा प्रधान झाला व देवरातासहि विदर्भ देशाच्या राजाची दिवाणगिरी मिळाली. कामंदकीस वैराग्य होऊन तिनें बुद्धधर्मान्वयें जोग घेतला. पुढें कालगतीनें देवरातास माधव नामें पुत्र झाला व भूरिवसूस मालती नामें कन्या झाली. हा पुत्र व ही कन्या हीं उभयतां पराकाष्ठेचीं लावण्यसंपन्न, सुशील व उदात्त स्वभावाचीं होतीं. ह्या मुलांचे बाप आपला गुरुगृहींचा संकेत विसरले नव्हते; परंतु उघड व प्रसिद्धपणें मुलांचें लग्न करण्यास त्यांनां मोठी अडचण आली. ती अशी:—

पद्मावतीच्या राजाजवळ नंदन नांवाचा एक अमात्य होता. तो राजाच्या मोठ्या कृपेंतला असे. मालतीचें रूप पाहून नंदन मोहित झाला व त्यानें भूरिवसूकडून मालती आपल्याला देववावी, अशी राजाला मोठी भीड घातल्यावरून राजानें त्याच्या स्नेहास्तव मालती नंदनास देण्याविषयीं भूरिवसूस गळ घातली. भूरिवसु राजाचा ताबेदार पडला. त्याला राजाचा शब्द मोडून त्याचें मन दुखवेना; व आपला पूर्वसंकेत मोडण्याविषयींहि त्याचें मन होईना. ह्याप्रमाणें तो मोठ्या पंचाइर्तींत पडला. ह्या संकटसमयीं त्यानें आपली गुरुबहीण महाचतुर कामंदकी, हिला सर्व मजकूर सांगून राजाचा कोप न होतां आपला हेतु सिद्धीस जाण्याविषयीं तिची मसलत व मदत घेतली.

मग कामंदकीच्या सांगण्यावरून देवरातानें आपला मुलगा माधव, याला मकरंद नामक एक सोबती बरोबर देऊन राजनीति शिकावयासाठीं पद्मावती नगरीस कामंदकीकडे पाठविलें. माधव तेथें आल्यावर कामंदकी त्याला कांहीं मिषानें भूरिवसूच्या वाड्यावरून जावयास सांगत असे. तसेंच तिनें आपल्या पक्षाची लवंगिका नामें एक दासी मालतीजवळ ठेविली होती. ती माधव रस्त्यांतून जाऊं लागला असतां त्याला मालतीस दाखवी, व त्याच्या गुणांचें वर्णन तिच्याजवळ करी. तेणेंकरून मालतीचें प्रेम माधवावर जडलें. तसेंच पुढें एक दिवस कामदेवाचा उत्साह पहावयाकरितां माधव मदनोद्यानांत गेला होता, व मालतीहि तेथें आली होती. तेव्हां त्या दोघांची नजरानजर होऊन माधवाचीहि प्रीति मालतीवर बसली, आणि दोघें एकमेकांच्या विरहानें झुरूं लागलीं.

ह्याप्रमाणें माधवावर मालतीचें मन बसलें. तथापि मालती सुशील व गंभीर स्वभावाची मुलगी होती, व आपल्या कुलास आणि नांवलौकिकास बट्टा आणणाऱ्या गोष्टीचा तिला मरणापेक्षांहि त्रास असे. तेव्हां ती पित्याच्या अनुमतावांचून गुप्तपणें माधवाशीं विवाह करावयास राजी होणार नाहीं, हें भय कामंदकीस होतें. मग कामंदकी एक दिवस समाचारास ह्मणून मालतीकडे जाऊन, तिनें कांहीं प्रसंग काढून मालतीपाशीं माधवाच्या कुलाचें व गुणांचें वर्णन केलें, व 'तुझा बाप राजाचा लोभ संपादण्याकरितां नंदनास तुला देणार' असें बोलून 'तुझ्या बापाचें तुझ्या सुखाकडे लक्ष्य नाहीं, स्वार्थाकडे आहे,' असें तिला सुचविलें, आणि तेणेंकरून तिच्या मनांत बापाच्या ममतेविषयीं संशय आणिला.

पद्मावती नगरीपासून जवळच स्मशानांत अघोरघंट ह्या नांवाचा एक कापालिक रहात असे. त्याची कपालकुंडला ह्मणून एक शिष्यीण होती. तीं दोघें घोर उपासना करणारीं होतीं. आपणास अद्भुतसिद्धि प्राप्त व्हावी ह्मणून अघोरघंटानें सर्वलक्षणयुक्त व लावण्यसंपन्न अशा एक कन्येचा बली द्यावयाचें ठरवून मालतीला रात्रीं तिच्या बापाच्या वाड्यांतून निजलेली चोरून आणली व तिच्या अंगावर तांबड्या फुलांच्या माळा घालून तिला स्मशानांतील चामुंडा देवीच्या पुढें बलि देण्याकरितां उभें केलें. अघोरघंट तिच्या अंगावर वार करणार, इतक्यांत मालती आपणास प्राप्त होत नाहीं, ह्या त्रासानें माधव स्मशानांत फिरत असतां तिचा शब्द ऐकून तेथें आला, आणि मालतीस वांचवून त्यानें अघोरघंटाचा वध केला.

पुढें मालतीचें नंदनाशीं लग्न ठरल्यावर लग्नाचे दिवशीं गांवाबाहेर देवीचें देऊळ होतें, तेथें कामंदकी कुलधर्मान्वयें मालतीस व लवंगिकेस आपल्याबरोबर घेऊन गेली. त्याच वेळेस माधव व मकरंद ह्यांनां त्याच देवळाचे गाभाऱ्यांत गुप्तपणें बसावयास कामंदकीनें सांगितलें होतें. मालती लवंगिकेसहवर्तमान देवळाचे गाभाऱ्यांत गेली असतां, ती आपल्या दुर्दैवाविषयीं शोक करूं लागली व माधवाचे गुण व उपकार आठवून रडूं लागली, आणि प्राणत्याग करण्याचा निश्चय करून त्या गोष्टीविषयीं अनुमत देण्याविषयीं लवंगिकेच्या पायां पडूं लागली. इतक्यांत लवंगिकेच्या संज्ञेनें माधव तिच्या जागीं उभा राहिला. मालतीनें यावेळीं दुःखानें डोळे मिटले होते. माधवास लवंगिका असेंच समजून तिनें आलिंगन करून आपल्या मनांतलें सर्व हितगुज त्याला सांगितलें. पुढें वर पाहून त्याला ओळखून ती लाजली. मग कामंदकी आंत येऊन तिनें आग्रह केल्यावरून मालती माधवासहवर्तमान तिच्या ( कामंदकीच्या ) मठांत चोरवाटेनें गेली. इकडे कामंदकीनें मकरंदास मालतीचें सोंग देऊन भूरिवसूच्या घरीं नेऊन त्याचें ( मकरंदाचें ) नंदनाशीं लग्न लाविलें.

नंदनाची बहीण मदयंतिका हिच्यावर मकरंदाचें मन बसलें होतें. तिचें त्याशीं लग्न व्हावें ह्मणून कामंदकीनें बुद्धरक्षिता ह्मणून आपल्या पक्षाची एक सखी मदयंतिकेपाशीं ठेविली होती. त्या बुद्धरक्षितेनें पुष्कळ स्तुति केल्यावरून मदयंतिकेच्या मनांत मकरंदाविषयीं प्रेमभाव उत्पन्न झाला होता. पुढें एके दिवशीं ती नगरांतून जात असतां, सांपळ्यांतून सुटून भडकलेला एक पाळींव वाघ तिच्या अंगावर आला. त्याच वेळीं दैववशात् मकरंद तिकडून जात होता, त्यानें त्या वाघावर उडी घालून त्याचा वध करून मदयंतिकेस सोडविलें; तेणेंकरून तिचें चित्त त्यावर जडलें होतें.

नंतर मालतीचा वेष धरणाऱ्या मकरंदाचें नंदनाशीं लग्न होऊन तो त्याच्या घरीं गेला असतां नंदन कामातुर होऊन मालतीच्या भ्रांतीनें मकरंदास झोंबूं लागला. तेव्हां मकरंदानें झिटकारल्यावरून तो रागावून 'तूं लग्नाच्या पूर्वीपासून वाईट चालीची आहेस' असें ह्मणून निघून गेला. मग आपल्या भावाचा मालतीशीं कज्जा झाला, हें बुद्धरक्षितेच्या तोंडून ऐकून मदयंतिका मालतीच्या खोलींत बुद्धरक्षितेसहवर्तमान आली. तेथें मकरंद झोंपेचें मिष करून पलंगावर पडला होता, व लवंगिका त्याच्या शेजारीं होती. मग मालती जागी होई तोंपर्यंत

आपण येथेंच गोष्टी सांगत बसूं, असें ह्मणून लवंगिका व बुद्धरक्षिता ह्यांनीं मदयंतिकेजवळ हळूच मकरंदाची गोष्ट काढली. मदयंतिका विश्वासानें आपल्या हितगुजाच्या गोष्टी सांगूं लागली असतां त्यांनीं तिला विचारिलें कीं, 'मकरंदावर आपलें प्रेम इतकें आहे ह्मणून तूं सांगतेस, पण मकरंद ह्यावेळीं येथें येऊन पाणिग्रहण करण्याविषयीं बोलूं लागल्यास तूं होय ह्मणशील?' मदयंतिकेनें 'होय ह्मणेन,' असें भावार्थानें उत्तर दिलें. तें ऐकतांच मकरंदानें पलंगावरून उठून तिला ओळख दिली. नंतर त्या सर्वांचा कामंदकीच्या मठांत जाण्याचा विचार ठरून तीं तिकडे चालतीं झालीं.

तीं जात असतां वाटेनें शहरच्या रखवालदारांनीं त्यांनां अटकाव केला. त्या घालमेलींत एका चाकराबरोबर त्या सर्व स्त्रियांस कामंदकीच्या मठाकडे लावून देऊन, मकरंद रखवालदाराशीं मारामारी करित राहिला. त्या स्त्रिया पोहोंचल्यावर आपला मित्र मारामारींत सांपडला आहे, ही बातमी कळतांच माधव मोठ्या त्वरेनें त्याच्या साह्यास आला. त्या दोघांनीं मोठा पराक्रम करून रखवालदारांचा पराभव केला. ही बातमी राजाला कळल्यावरून, त्यानें त्यांस बोलावून नेलें, व त्यांची हकीगत ऐकून व त्यांचा पराक्रम पाहून त्यांच्यावर राजा प्रसन्न झाला आणि त्यांनीं पराक्रमानें जिंकिलेल्या कन्यांशीं लग्न करण्याची त्यांनां परवानगी दिली.

परंतु इकडे मालती, मदयंतिका, बुद्धरक्षिता व लवंगिका, कामंदकीच्या मठांत असतां कोणी कांहीं कामासाठीं तर कोणी दुसऱ्या कामासाठीं अशा जाऊन मालती मात्र एकटी उरली होती. अघोरघंटाची शिष्यीण कपालकुंडला, आपल्या गुरूच्या वधाबद्दल सूड उगवण्याकरितां संधि पाहतच होती. तिनें मालतीला एकटी गांठून तिला बलात्कारानें उचलून मंत्रसामर्थ्यानें आकाशमार्गानें श्रीपर्वतावर नेलें. तेथें ती मालतीचा घात करणार होती, परंतु त्याच पर्वतावर सौदामिनी ह्मणून कामंदकीची एक पुरातन शिष्यीण तपश्चर्या करित होती, तिला ती गोष्ट कळून तिनें त्या दुष्ट कपालकुंडलेपासून मालतीला सोडविलें.

इकडे माधव व मकरंद राजवाड्यांतून मोठ्या हर्षानें परत येऊन पाहतात, तों मालती नाहीं. पुढें शोध करतां तिचा कांहींच थांग लागेना. मग शोकानें वेडा होऊन माधव वनांत फिरूं लागला व मकरंद मित्रत्वामुळें त्याजबरोबर असे. ते दोघे शोक करित असतां, माधवाला मूर्छा येऊन तो निश्चेष्ट पडला.

तें पाहून मकरंद व्याकूळ होऊन माधवाच्या अगोदर आपण प्राण द्यावा, असा निश्चय करून खालीं नदींत उडी टाकावयाकरितां ह्मणून एका उंच कड्याच्या कांठावर उभा राहिला, आणि आतां उडी घेणार, इतक्यांत सौदामिनीनें त्याचें निवारण केलें. आपल्या विरहानें माधव आपल्या जीवास अपाय करून घेईल, असें वाटून मालतीनें प्रार्थना केल्यावरून, योगसामर्थ्यानें आकाशमार्गानें ती तेथें आली होती. तिच्यापाशीं मालतीजवळची खूण होती, ती दाखवून तिनें माधव व मकरंद ह्यांचें समाधान केलें.

तसेंच कामंदकी व मालतीच्या लवंगिका वगैरे सख्याहि शोकानें व्याकूळ झाल्या होत्या, व तिचा बाप भूरिवसु कन्येच्या वियोगदु:खानें अग्निप्रवेश करण्याविषयीं उद्युक्त झाला होता, त्या सर्वांनां मालतीची गांठ पाडून सौदामिनीनें हर्षित केलें. नंतर मालती व माधव, आणि मकरंद व मदयंतिका ह्यांचे विवाह होऊन सर्व हर्ष पावलीं."

**कृष्णशास्त्री चिपळूणकर.**

# या नाटकांतील पात्रें.

| | |
|---|---|
| सूत्रधार. | नाटकाचा कर्ता. |
| पारिपार्श्वक, नट. | सूत्रधाराच्या हाताखालील सोंगाडे. |
| माधव. | नायक. ( देवराताचा पुत्र. ) |
| मकरंद. | उपनायक. ( माधवाचा मित्र. ) |
| भूरिवसु. | पद्मावतीच्या राजाचा अमात्य. (मालतीचा पिता. ) |
| नंदन. | पद्मावतीच्या राजाचा अमात्य. ( मदयंतिकेचा भाऊ. ) |
| कलहंस. | माधवाचा हुजऱ्या. |
| अघोरघंट. | क्रूरदेवतोपासक. |
| मालती. | नायिका. ( भूरिवसूची कन्या. ) |
| मदयंतिका. | उपनायिका. ( नंदनाची बहीण. ) |
| लवंगिका. | मालतीची मैत्रीण. |
| वासंतिका. | मालतीच्या दासी. |
| मेघमाला. | मालतीच्या दासी. |
| कामंदकी. | बौद्धमताची एक जोगीण. |
| अवलोकिता. | कामंदकीच्या शिष्यिणी. |
| मंदारिका. | कामंदकीच्या शिष्यिणी. |
| बुद्धरक्षिता. | कामंदकीच्या शिष्यिणी. |
| सौदामिनी. | कामंदकीच्या शिष्यिणी. |
| कपालकुंडला. | क्रूरदेवतोपासक एक जोगीण. |

# मालतीमाधव नाटक.

## अंक १ ला.

### मंगलाचरण.

[ सूत्रधार प्रवेश करितो. ]

पद.

गजवदनाची हे क्रीडा, नाशो विघ्नांची पीडा. । ध्रु० ।

प्रदोषसमयीं शंभू तांडवें[1] करितां, आनंदानें
नंदी वाजवि मृदंग धुम् धुम्, तद्ध्वनि ऐकुनि कानें
कुमारबर्ही[2] अंबुद[3]गर्जित शंकुनियां वेगानें
येतां, त्याला पाहुन भ्याला मुकुटीं फणिपति[4] ज्याच्या. १

अंगाकुंचनें[5] करुनी फणिपति नासाविवरीं[6] शिरता;
भिउनि गडबडे चींचीं[7] करि बहु जनिमृतिभयसंहर्ता[8];
विघ्नाद्रीचें भेदन करितो तच्चरणांतें स्मरतां;
एक्या वदनें वर्णूं कैसा अनंतगुणगण ज्याचे. २

गंडस्थलमदनिर्झरलोभें वैसुनि मधुकरपंक्ती
मदोदकातें प्राशी, जैशी रसहर्षें द्विजपंक्ती;
मंजुळ गुंजारव करि, तेणें दहा दिशाही भरती,
थै थै नाचे शिवासवें जो त्याला पाहुन धालों. ३

गजवदनाची हे क्रीडा, नाशो विघ्नांची पीडा.

---

१ नृत्य. २ कार्तिकस्वामीचा मोर. ३ मेघगर्जना. ४ सर्प, वासुकी. ५ अंग बारिक करणें. नाकाच्या भोंकांत. ७ गजशब्द. ८ जन्ममरणभय हरणारा.

रुंडें[1] ज्यावर लोंबती, सुरसरिद्वारि[2] स्रवे ज्यावरी,
विद्युत्प्रायें[3] ललाटलोचनपुटज्योती[4] जयातें वरी[5],
ज्यामाजी लघुकेतकांपरि[6] गमे बालेंदुलेखा[7] मना,
रक्षो नागनिबद्ध[8] तो शिवजटाजूट त्रिकाळीं जना. १

पक्ष्मालीपिंगवर्णीं[9] कणसमचि तडिद्व्रातें[10] होतो जयाच्या,
ज्याच्या कोणांत काल क्षयसमयिं[11] करी होम कोटी जगांच्या,
ज्वाला संतप्तचूडाशशिगलितसुधासार नादींवि[12] ज्यातें,
शंभूचें नेत्र रक्षो स्मरदहन तिजें[13] सर्वदा तें तुह्मांतें. २

**सूत्रधार**—(पुढें होऊन) पुरे आतां हा विस्तार. सकल भुवनांचा दीप, असा हा भगवान् सूर्य उदयाचलावर येत आहे. अगोदर त्याची स्तुति केली पाहिजे. ( नमस्कार करून )

हे देवा, विश्वमूर्ते ! नमन करुनियां मी तुझ्या पादपद्मा
मागें; दे तूं मला श्री दुरित सकलही नाशुनी, भद्रसद्मा[14] !
श्रेयोदायी प्रभांची खनिच असशि तूं, विश्वनाथा ! प्रसादें,
जेणें होईल माझें सकलहि बरवें, ऐशिया वाग्रसा[15] दे. १

(पडद्याकडे पाहून) मारीषा ! सर्व सामग्री तयार झाली आहे; आणि भगवान् कालप्रियनाथ ह्याच्या यात्रेकरितां चोहोंकडून आलेल्या मोठमोठ्या लोकांचा समाज मिळाला आहे. तसेंच, या चतुर व विद्वान् अशा लोकांच्या सभेनें, कांहीं एखादें अपूर्व प्रकरण लावून आपलें मनोरंजन करावें, अशी मला आज्ञा केली आहे. तर मग सोंगाडे उगेच कां बरें बसले आहेत ?

**पारिपार्श्वक**—( प्रवेश करून ) मित्रा, सभासदांनीं नाटकांत जे गुण असावे ह्मणून सांगितलें आहे, त्या गुणांचें नाटक आह्मांला तर कांहीं सुचत नाहीं.

**सूत्रधार**—मारीषा, चतुर व श्रेष्ठ सभासद नाटकांत कोणकोणते गुण असावे ह्मणून ह्मणतात ?

---

१ नरमस्तकें. २ गंगाजल. ३ विजेसारखें. ४ तेज. ५ व्यापतें. ६ केवड्याचें लहान पान. ७ बालचंद्राची कोर. ८ सर्पवेष्टित. ९ पापण्यांच्या पिंगट वर्णांत. १० विद्युत्समूह. ११ कल्पांतीं. १२ नादित करी. १३ तिसरें. १४ हे कल्याणनिधे. १५ वाणीचा रस दे.

**नट**[1]—त्या ग्रंथांत अनेक प्रकारचे उत्कट रस असावे; गूढ संविधानकें असावीं; चित्तास गोड लागणारीं अशीं मित्रत्वाचीं कृत्यें वर्णिलीं असावीं; मदनव्यापार-संबंधीं उद्धत वर्तन असावें; मनोरंजक कथा असावी; आणि वाक्चातुर्य असावें.

**सूत्रधार**—मारीषा, आठवलें, रे, आठवलें !

**नट**—मित्रा, काय तें ?

**सूत्रधार**—दक्षिण देशांत पद्मनगर नांवाचें एक नगर आहे. तेथें तैत्तिरीय शाखेचे, काश्यपगोत्री, सर्ववंद्य, पवित्र, पंचाग्निसाधन करणारे, व्रती, सोमयाजी, ब्रह्मवेत्ते, असे डंबर नांवाचे ब्राह्मण राहत असत.

**आदरिती बहु शास्त्रें तत्त्वज्ञानार्थ, वपु तपा, स्त्रीतें**
**संतत्यर्थ, धनातें इष्टापूर्तार्थ, दक्ष तंत्रीं ते. १**

ह्या थोर कुलांत पूज्य आणि विख्यात, गोपाळभट्ट ह्मणून होता. त्याला पवित्र-कीर्ति असा नीलकंठ नामें पुत्र झाला. त्याच्यापासून जातुकर्णी नामक स्त्रीचे ठायीं भवभूति नामा एक महाकवि जन्मला. त्याला भट्ट श्रीकंठ असेंहि ह्मणतात. हा आह्मां नाटककारांवर लोभ करी. त्या कवीनें **'मालतीमाधव'** ह्या नांवाचें एक नाटक करून आह्मांला दिलें आहे. त्यांत सभासद ह्मणतात ते सर्व गुण आहेत. त्या कवीनें ह्मटलें आहे—

**कोणी निंदिति जे मदीय कविता अल्पज्ञ लोकांमधीं,**
**हा आयास तदर्थ[2] मी न करितों, मत्तुल्य कोणी कधीं**
**कीं होईल, अनंत काळ ह्मणुनी; आहेच किंवा तसा;**
**ह्या भूमीस विशाळता, असुनियां नाहीं ह्मणावा कसा ? १**
**वेदांतन्यायसांख्यादिक बहुविध जीं वादशास्त्रें, तयांतें**
**जाणूनी काय, वेदाध्ययनहि करुनी, थोरवी नाटकातें ?**
**बंधीं प्रौढत्व, माधुर्यहि, जरि विलसे अर्थगांभीर्य साचें,**
**तेणें पांडित्य वैदग्ध्यहि उघड दिसे बुद्धिशाली कवीचें. २**

तर तो आमचा मित्र भवभूति कवि, ह्यानें दिलेलें मालतीमाधव नांवाचें नवीन नाटक आह्मांजवळ आहे. तेंच कालप्रियनाथाच्या पुढें लावून प्रसिद्ध करावें,

---

१ मारीष, पारिपार्श्वक आणि नट हीं एकाचींच नांवें होत. २ अवमानकर्त्यांसाठीं.

असा आमचा बेत आहे. ह्यास्तव सर्व गायकांनीं गाण्यास आरंभ करून माझें साह्य करण्यास सिद्ध असावें.

**नट**—ठीक आहे, आज्ञेप्रमाणें करितों. (स्मरण करून) ज्याला जें सोंग शोभतें, तें त्याला देऊन त्या त्या सोंगाची बतावणी करण्यास आपण तयार केलेंच आहे. बौद्ध धर्माची गोंसावीण कामंदकी, हिचें सोंग घेण्यास आपणच प्रवीण आहां; आणि तिची शिष्यीण अवलोकिता, हिचें सोंग मजकडे आहे.

**सूत्रधार**—बरें, मग पुढें काय ह्मणतोस ?

**नट**—पुढें हेंच ह्मणावयाचें कीं, ह्या प्रकरणाचा नायक मालतीवल्लभ जो माधव, त्याचें सोंग कोण घेतो !

**सूत्रधार**—मकरंद आणि कलहंस ह्यांच्या सोंगांच्या वेळेस त्या गोष्टीची तजवीज केली जाईल.

**नट**—बरें तर, भवभूतीचें तें नाटक लावून सभासदांचें रंजन करूं, चला.

**सूत्रधार**—ठीक आहे, हा पहा मी कामंदकी झालों!

**नट**—आणि मीहि अवलोकिता झालों, पहा!

[ जातात.

---

## प्रवेश १ ला.

### ( *विष्कंभक. )

[ **स्थळ**—कामंदकीचा आश्रम. भगवीं वस्त्रें नेसलेल्या कामंदकी आणि अवलोकिता बोलत बसल्या आहेत, असा प्रवेश. ]

**कामंदकी**—वत्से अवलोकिते ?

**अवलोकिता**—माई, काय आज्ञा आहे ?

**कामंदकी**—भूरिवसु आणि देवरात ह्यांचीं सुलक्षण अशीं जीं मालती आणि माधव ह्या नांवांचीं अपत्यें, त्यांचा विवाह व्हावा असें माझ्या मनांत फार आहे. तो घडेल काय ? ( डावा डोळा लवल्यासारखें करून हर्षानें )

**हृद्गत जाणे चक्षु, स्फुरतां जाणो शुभा सुघडे[1] करितें,**
**हें नयन वामें[2] असतां, दाक्षिण्यातें[3] पहा उघड धरितें. १**

**अवलोकिता**—माई, तुह्मांला ह्या कामाची मोठी काळजी लागलीसें दिसतें! भगवीं वस्त्रें नेसून कालक्रमण करणाऱ्या अशा तुह्मांला असल्या भानगडींत भूरिवसु अमात्य घालतो, आणि तुह्मीहि संसारपाशांतून सुटलेलें आपलें मन पुनः ह्या कामांत गुंतवितां, ही आश्चर्याची गोष्ट नव्हे काय ?

**कामंदकी**—वत्से, असें बोलूं नको. अग—

**स्नेहें भूरिवसु स्वकृत्यकरणीं मातें नियोजीतसे,**
**प्राणानें अथवा तपें करुनियां स्यांही करावें तसें**
**त्याचें कार्य; विरक्तही असुनियां जे कां परार्थाप्रती**
**स्वार्थ त्यागुनि सर्वथा झटति, त्यां नाहीं त्रिलोकीं प्रती[4]. १**

बाई अवलोकिते, ज्या वेळीं आह्मी विद्याभ्यास करावयासाठीं गुरूच्या आश्रमांत चोहींकडून एके ठिकाणीं मिळालों होतों, त्या वेळीं आमच्या सौदामिनीच्या देखत अमात्य भूरिवसु आणि विदर्भ राजाचा मंत्री देवरात, ह्यांची, आपण एकमेकांशीं अपत्यसंबंध करूं, अशी प्रतिज्ञा झाली आहे, ती हकीगत तुला ठाऊक नाहीं का ? सांप्रत देवरातानें कुंडिनपुराहून आपला पुत्र माधव ह्याला नीतिशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं ह्या पद्मावती नगरीस पाठविलें, हें फार चांगलें केलें. असें करण्यांत त्यानें—

---

१ घडावयाजोगें. २ डावें. ३ उजवेपणातें; पक्षीं चतुरपणातें. ४ उपमा.

* पूर्वोत्तरकथासूचक भाग.

**अपुल्या प्रियसुहृदाला स्मरण दिलें पूर्विंच्या प्रतिज्ञेचें,**
**स्वसुतीं गुणालयींही, केलें सोत्कंठ चित्त मालतिचें. १**

**अवलोकिता**—तरमग तो अमात्य उघडपणें स्वतः आपणच माधवास मालती कां देत नाहीं ? गुप्तपणानें मध्यस्थी करण्यास तुह्मांला कां सांगतो ?

**कामंदकी**—अग, ह्याचें कारण–

**जयावरी नृपाचा बहु प्रेमा, तो नृपसखा नंदन नामा,**
**मालती लावण्याची सीमा, नृपमुखें मागतसे. १**
**राजयाच्या समक्ष जरी, अमात्य नाहीं ह्मणेल तरी,**
**उपजेल कोप नृपाअंतरीं, ह्मणूनि हा उपाय योजीतसे. २**

**अवलोकिता**—माधवाविषयीं भूरिवसु असा तिऱ्हाईतपणें वागतो, कीं कोणी ह्मणेल त्याला त्या माधवाचें नांवदेखील ठाऊक नाहीं ! ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे !

**कामंदकी**—अग, तें उगीच वरील सोंग आहे !

**अलपवयी कुमार कुमारी, आपुली प्रीति परस्परीं**
**उघड करिती अतिभारी, या अंग आपुलें न दिसावें. १**
**ऐसा विचार मनीं करून, महाचतुर तो प्रधान,**
**करी स्वाभिप्रायाचें गोपन, नृपा आणि नंदना वंचावया. २**

आणखी असें आहे, कीं—

**ज्ञाता मध्यस्थ[1], सर्वांप्रति कपटबळें जिंकुनी स्वार्थ साधी,**
**झांकोनी स्वांतरींचें गुज मतिविभवें दाखवी वृत्ति साधी;**
**जें जें लोकां स्वतर्कैंकरुनि समजण्यासारखें तें न दावी,**
**मौनें कार्यार्थ कर्ता, सुमति, चतुरता त्या न कैशी वदावी ? १**

**अवलोकिता**—भगवति, मीहि आपल्या आज्ञेप्रमाणें निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या चमत्कारिक गोष्टी सांगून माधवास राजमार्गानें भूरिवसूच्या वाड्यावरून नेत असतें.

**कामंदकी**—होय, मालतीची सखी लवंगिका हिच्याकडून तें वर्तमान मला कळलें आहे.

---

१ अंग न दाखवणारा.

**जातो माधव मंद मंद गतिनें त्या राजमार्गें सदा,**
**वारंवार तयास माडिवरुनी ती[१] पाहुनी, सर्वदा,**
**जैशी का रति मन्मथासि बघतां, उत्कंठिता तत्क्षणीं**
**होते, तप्त, तशीच कामगलिता, त्या सात्त्विकीं लक्षणीं. १**

**अवलोकिता**—खरी गोष्ट. मालतीनेंहि आपल्या मनाला कांहीं करमणूक होण्यासाठीं माधवाची तसबीर काढली आहे. ती लवंगिकेकडून मंदारिकेचे हातीं आज आली आहे.

**कामंदकी**—( चिंतन करून ) लवंगिकेनें चांगलें केलें! कारण, माधवाचा हुजऱ्या कलहंस त्या मंदारिकेच्या नादीं आहे, ह्यामुळें मंदारिका त्याला तें चित्र दाखवील, आणि त्याच्याकडून तें माधवाच्या दृष्टीस पडेल, ह्या अभिप्रायानेंच लवंगिकेनें तसें केलें असावें.

**अवलोकिता**—आज मदनोद्यान नामक बागेंत कामदेवाचा मोठा उत्साह आहे. तेथें मोठी मौज असते, असें मीं माधवास सांगितल्यावरून तो सकाळींच त्या बागेंत चमत्कार पहावयास गेला आहे. तेथें मालतीहि जाईल. मग तेथें सहजच दोघांची दृष्टादृष्ट होईल.

**कामंदकी**—शाबास! मुली, फार चांगलें केलें! हें तुझें चातुर्य पाहून माझी पूर्वींची शिष्यीण सौदामिनी, हिची मला आठवण झाली.

**अवलोकिता**—ती सौदामिनी लोकोत्तर चमत्कार दाखविणारी अशी मंत्रसिद्धि संपादून आतां श्री पर्वतावर कापालिक व्रत धरून बसली आहे, नव्हे का?

**कामंदकी**—तुला हें कोठून बरें समजलें?

**अवलोकिता**—ह्या नगरांत महाश्मशानामध्यें कराला ह्या नांवाची एक देवी आहे—

**कामंदकी**—होय, आहे खरी. तिला अनेक प्रकारच्या प्राण्यांचे बळी फार आवडतात, अशी घोर उपासना करणाऱ्या लोकांची समजूत आहे. बरें, मग?

**अवलोकिता**—श्री पर्वतावरून अघोरघंट ह्मणून कोणीएक जोगी आला आहे. तो येथें जवळच अरण्यांत राहतो. तो ह्मणे माणसांच्या कवट्यांच्या माळा गळ्यांत घालतो व रात्रीचा संचार करितो. त्या जोग्याची कपालकुंडला ह्मणून एक शिष्यीण आहे. तिच्या अंगीं मंत्रसामर्थ्य मोठें आहे. ती प्रतिदिवशीं संध्याकाळीं त्या श्मशानांत येत असते. तिच्यापासून मला ही बातमी समजली.

१ मालती.

**कामंदकी**—सौदामिनी फार थोर आहे. ती ह्मणेल तें करील!

**अवलोकिता**—ती गोष्ट राहूंद्या आतां. पण माई, माधवाच्या निरंतर बरोबर हिंडणारा माधवाचा बाळमित्र मकरंद, ह्याचा जर नंदनाची बहीण मदयंतिका हिच्याशीं विवाह होईल, तर हेंहि एक माधवाचें दुसरें प्रिय केल्यासारखेंच होईल, नाहीं का?

**कामंदकी**—आणि तें माझ्याहि ध्यानांत आहे. त्या कार्याकडे मीं बुद्ध-रक्षितेची योजना अगोदरच केली आहे.

**अवलोकिता**—मला वाटलें होतेंच तसें! ह्मटलें, ही गोष्ट आपल्या आटो-क्यांतून कशी चुकेल? फार चांगली तजवीज केली माई आपण!

**कामंदकी**—( चिंतन करून ) तर मग ऊठ आतां. माधवाचा समाचार घेऊन चल आपण मालतीकडे जाऊं. (चिंतन करून) मालती मनाची फार थोर आहे. तिला अयोग्य वाटेल अशी गोष्ट ती कदापि करणार नाहीं! ह्मणून ह्या कामांत तिच्याशीं फार जपून व चतुराईनेंच वागलें पाहिजे. ईश्वर करो, आणि—

**शरज्ज्योत्स्ना[1] जैशी करि कुमुद सानंद, रतिनें[2]**
**सुजन्मा[3] तो कीजे प्रमुदित तसा हंसगतिनें[4];**
**वराचे कन्येचे अनुपम[5] करी जो गुण विधी[6],**
**तयाच्या कृत्याचें त्वरित फल होवो निरवधी[7].**

[ दोघी जातात.

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—मदनोद्यान. हातांत एक तसबीर घेऊन कलहंस येतो, असा प्रवेश. ]

**कलहंस**—मदनाचा सौंदर्यगर्व घालविणारा, आणि मालती इतकी गंभीर मनाची असतां तिलाहि सहज मोहित करणारा असा माझा धनी माधव, ह्या वेळेस कोठें बरें भेटेल? (इकडे तिकडे फिरून) फिरून फिरून दमलों बाबा! तर अमळ ह्या बागेंत बसून विश्रांति घेऊं. मग करूं मकरंद आणि माधव ह्यांचा शोध.

( बागेंत जाऊन बसतो, इतक्यांत मकरंद येतो. )

---

१ शरत्कालाचें चांदणें. २ प्रीतीनें. ३ माधव. ४ हंसगमना मालती तिनें. ५ अतुल्य. ६ ब्रह्मदेव. ७ चांगलें.

**मकरंद**—( प्रवेश करून ) माधव मदनोद्यानांत गेला ह्मणून अवलोकितेनें सांगितलें आहे. ( इकडे तिकडे पाहून ) अरे, हा पहा माझा सखा माधव इकडेसच येत आहे! ( निरखून पाहून ) ह्याचें तर–

**तेजोहीन शरीर, मंदगतिही, चक्षू दिसे शून्यसें,**
**श्वासोच्छ्वास बहू; मला इतर तो हेतू न याचा दिसे!**
**कामाज्ञा फिरते जगीं, विकृतितें तारुण्य हें देतसे,**
**ते ते सुंदर भाव धैर्य मथिती, देती जनातें पिसें. १**

( इतक्यांत वर वर्णिल्याप्रमाणें माधव येतो. )

**माधव**—(स्वगत)—

**गेलें चित्त मदीय त्या विधुमुखी[1]पाशीं न ये मागुतें,**
**लज्जा सोडुनि, धैर्य टाकुनि, नया सांडूनियां, गुंततें**
**तत्ध्यानांत, बळेंचि ओढुनि जरी आणीतसें त्याजला,**
**हा कामी रतिनाथबाणें[2] हृदयीं लागूनियां गांजला[3]. १**

काय आश्चर्य हें !

**होतें सान्निध्य जेव्हां क्षणभरि मज त्या चंद्ररम्याननेचें[4],**
**तेव्हां मच्चित्त जैसें अमृतहृदतळीं[5] स्नात सानंद साचें;**
**आश्चर्यें स्तब्ध झालें, न सुचवि[6] मजला अन्य कांहीं सदैव,**
**तें आतां दुःख देतें ज्वलनलहरिंनीं[7] स्पृष्टसें[8], काय दैव ! २**

**मकरंद**—सख्या माधवा, इकडे ये, इकडे ये. तिकडे कोठें चाललास ?

**माधव**—( मागें उलटून पाहून ) कोण! माझा सखा मकरंद ?

**मकरंद**—( पुढें येऊन ) ऊन फार झालें आहे, तर आपण दोन घटका ह्या बागेंत बसूं या.

**माधव**—जसें मित्रास आवडेल तसें. ( दोघे बसतात. )

**कलहंस**—( पाहून स्वगत ) अरे, माझा धनी माधव, मकरंदासहवर्तमान सुंदर बकुलवृक्षांच्या ह्याच राईंत बसला आहे! आतां, कामपीडेनें दुःखित अशा मालतीच्या डोळ्यांस सुख देणारें हें त्याचें स्वतःचें चित्र त्याला दाखवितों. किंवा

---

१ चंद्रवदना मालती. २ मदनबाण. ३ दुःखित झाला. ४ मालतीचें. ५ अमृताच्या डोहांत. ६ सुचूं न देई. ७ अग्निज्वालांनीं. ८ स्पर्शिलेसें.

इतकी घाई कशाला ? दोन घटका बागेंत बसून विसांवा घेतल्यावर मगच त्याला तें दाखवावें.

**माधव**—पहा, त्या कांचनवृक्षाच्या पुष्पांचा मधुर, सुशीतल सुगंध सर्व बागेंत पसरला आहे. तर चल, त्याच्याच खालीं आपण जाऊन बसूं. ( तसें करितात. )

**मकरंद**—गड्या माधवा, नगरांतील सर्व सुंदर स्त्रिया आज नटून सजून कामदेवाच्या दर्शनाकरितां मदनोद्यानांत जमल्या होत्या, तेथें तूंहि जाऊन आलास ह्मणून ऐकिलें. तेथें कांहीं कमीजास्त झालें असावें. कारण, तुझी चित्तवृत्ति आज नित्याप्रमाणें दिसत नाहीं! खचीत तूं मदनाच्या बाणाच्या झपाट्यांत सांपडला आहेस!

**माधव**—( लज्जेनें तोंड खालीं घालून उगाच राहतो. )

**मकरंद**—हें सुंदर कमलासारखें तोंड खालीं घालून कां बसलास ? पहा—

**इतर तामस जंतु रजोगुणी**
**विधिहरादिक देवशिरोमणी**
**स्ववश जो[1] करि, त्या वश तूं तरी**
**असशि; कां मग लज्जित अंतरीं ?** १

**माधव**—गड्या, तुला न सांगावें असें काय आहे ? सांगतों, ऐक. अवलोकितेनें तेथें मोठी मौज असते ह्मणून सांगितल्यावरून मी कामदेवाच्या मंदिरास गेलों. तेथें कांहीं वेळ इकडे तिकडे फिरून मौज पाहिल्यावर अंगणांत बकुळीचें झाड होतें त्याच्या खालीं बसलों. त्या झाडावर पुष्पसुगंधाच्या लोभानें शेंकडो भुंग्यांचे थवेच्या थवे येऊन लगटले होते. मग करमणुकीकरितां तेथील आपाप गळून पडलेलीं फुलें घेऊन मोठ्या चातुर्यानें त्यांची एक चमत्कारिक माळ गुंफावयास लागलों. इतक्यांत, मदनानें सर्व त्रैलोक्य जिंकून जणूं आपलें सामर्थ्य दाखवण्याकरितां उभारलेली चालतीबोलती पताकाच, अशी कोणीएक मनोहर तरुणी त्या कामदेवाच्या मंदिरांतून बाहेर आली. तिच्या अंगावरील दागिने आणि पेहराव, ह्यांच्यावरून तिचें लग्न झालें नसावेंसें दिसत होतें. तिच्या मुद्रेवरून आणि रीतीभातीवरून ती मनाची मोठी थोर व गंभीर असावीसें वाटलें.

---

१ मदन.

त्याचप्रमाणें तिच्या दासदासी मोठ्या सभ्य चालीच्या दिसत होत्या. यावरून ती कोणी थोरामोठ्याची कन्या असावी. मित्रा, तिचें लावण्य काय वर्णूं !

**सौंदर्यसार अवघें जणु एक झालें,**
**लावण्यकोशंगृहदैवत कीं उदेलें;**
**वाटे, सख्या ! विधुंमृणालसुधांदिकांहीं**
**कामें स्वयेंचि घडिली ललनोत्तमा ही. १**

नंतर तिच्या जिवाच्या सख्यांनीं 'चल गडे, आपण ह्या झाडाचीं फुलें तोडूं' असें ह्मटल्यावरून, ती तरुणी, मी ज्या बकुळीच्या झाडाखालीं बसलों होतों, त्याच झाडाखालीं आली. जवळ आल्यावर तिच्या चर्येवरून दिसून आलें कीं, एखाद्या कोणा महाभाग्यवान् पुरुषावर तिचा लोभ जडला असून बहुत दिवस त्याचा विरह होऊन तिला फार झुरणी लागली असावी. कारण—

**विंमर्दें मृणाली, तशी देहयष्टी**
**दिसे; म्लान, ती अंतरीं फार कष्टी;**
**सखीच्या नियोगें क्रियेची प्रवृत्ती,**
**मुखीं पांडुता भासली शून्यवृत्ती. १**

काय जन्मांतरचा योग असेल कोण जाणे? तिची माझी दृष्टादृष्ट झाल्यापासून माझें चित्त अगदीं तल्लीन होऊन गेलें आहे. तिला पाहिलें ह्मणजे कापराचें अंजन घातल्याप्रमाणें डोळे गार होतात ! जसा लोहचुंबक लोखंडास ओढितो, तसें तिनें माझें मन आपणाकडे ओढून घेतलें आहे. फार काय सांगूं—

**जडलें माझें चित्त तयेवरि, नसतां किमपि स्वार्थ,**
**केवळ निरवधिसंतापाचें रुजलें बीज व्यर्थ. १**

**दुःखें किंवा सुखें मानवां जीं जीं बहुविध होती,**
**तीं तीं घडवी दैव बळेंची; सर्वहि त्याचे हातीं. २**

**मकरंद**—सख्या माधवा, स्नेहांत स्वार्थ असतो, हें ह्मणणें चमत्कारिक आणि विरुद्ध आहे. स्वार्थानें जो झाला तो मुळीं स्नेहच नव्हे. पहा—

---

१ जामदारखाना. २ चंद्र. ३ अमृत. ४ मर्दनानें. ५ कमलिनी. ६ सांगण्यानें.

मित्राच्यां[1] उदयें प्रफुल्लित पहा तीं पुंडरीकें[2] कशीं
होती; तो धरि चंद्रकांत उदया येतां द्रवातें शशी[3];
स्नेहाचा न दिसेच हेतु दुसरा; नैसर्गिकी[4] अंतरीं
प्रीति एकचि हेतु, जो नच शके वर्णावया वैखरी[5]. १

बरें, मग पुढें काय झालें ?

**माधव**—नंतर तेथें–

तिच्या होत्या तेथें सुचतुर सख्या कुंदरदना,
'अगे बाई, तो हा नरवर!' असें, हास्यवदना
ह्मणोनी; भ्रूभंगें सुचवुनि मला फार बघती,
कटाक्षौघानें त्या जणु अमृतवर्षाव करिती ! १

ह्याप्रमाणें जशी काय आमची पहिली ओळख असावी, तशी मला लक्षून त्यांनीं तिची थट्टामस्करी केली.

**मकरंद**—( स्वगत ) काय ? एकून ओळखहि निघाली ?

**माधव**—मग असें ह्मणून–

पद.

कोणाचा कोणी आहे ? प्रिय सखये ! इकडे पाहें. । ध्रु ।
बोटानें दावुनि मजला, सांगती गुज हें तिजला;
लीलेनें टाळ्या पिटिती, कंकणें झणझण करिती. १
साजणी ! तव हें भाग्य, तुजला हा नरवर योग्य;
ताताचें ओझें खालीं होइल हा निश्चय, आली[6] ! २
मेखला[7] कटीस विराजे, हंसापरि गति ती साजे,
पायींचा पैंजण वाजे झुम्झुम्झुम् शब्दहि गाजे. ३
पाहियला पूर्वीं त्वां जो, तुजलागीं वर हा साजो !
तूं याची गे नवरी हो, दुसरीला हा न वरी हो. ४
वरचेवर पाहुन मातें, ऐशापरि सांगति तीतें;
तल्लीला पाहुनि भुललों, सखया ! मी तल्लिन झालों. ५
कोणाचा कोणी आहे ? प्रिय सखये ! इकडे पाहें.

१ सूर्याच्या. २ कमलें ३ चंद्र. ४ स्वभावसिद्ध, आंगची. ५ वाणी. ६ सखे. ७ कंबरपट्टा.

**मकरंद**—(स्वगत) हं हं, दोघांची पहिली प्रीति होती, हें ह्यावरून फारच उघड झालें.

**कलहंस**—(स्वगत) किती तरी गोड ही स्त्रियांची गोष्ट !

**मकरंद**—(उघड) बरें, मग पुढें काय झालें ?

**माधव**—

अशीं सख्यांचीं विनोदवचनें परिसुनि राजस बाळा,
स्मरें शिकविल्या कला अपूर्वा प्रकट करी वेल्हाळा. १
लज्जाहास्यकटाक्षादिक तैं बहुविध शृंगाराचे,
जयां वर्णितां शब्द न पुरती, विलास उमटति साचे. २
त्यांतें पाहुनि विसरुनि गेलों देहभान मी सारें,
वृत्ती झाली तन्मय, अंगीं भरलें मन्मथवारें. ३

आणखी,

प्रेमयोगें स्तब्धता ज्यांस ये ती,
जशीं कमलें नूतनें उमलतातीं;
अशा नयनीं वांकुड्या कटाक्षांहीं
कुरंगाक्षी मज घडोघडी पाही. १
नेत्रनेत्राची पडे सहज गांठी,
दृष्टि चोरी लाजुनी फार पोटीं,
भृकुटि तीच्या शोभती, जणू चापें
विश्वविजया ओढिलीं मदनभूपें ! २
असे लागोनी तिचे दृष्टिबाण,
होति कासाविस पंच मम प्राण;
चित्त माझें बापुडें वेधियेलें,
जणो उकलोनी खंड दोन झाले. ३

तिच्या अवलोकनांनीं माझी अवस्था अशी झाली, कीं—

भावगर्भ, अतिसुंदर, निश्चल, मंददृष्टिनें मातें
पाहुनि, गालीं हंसून, तीनें दर्शविलें प्रेमातें. १
तिच्या कटाक्षें, बाणें जैसें, मम मन वेधुनि गेलें,
पंगू ऐसें करून त्यातें तीनें स्वगृहा नेलें. २

मित्रा काय सांगूं? त्या तरुणीचा जो जो अवयव पहावा, तो तो अति सुंदर! नांव ठेवण्यास कोठेंहि जागा नाहीं. तिचा आपणावर अनुराग आहे, असें वाटून माझें मन तर खरोखर तिच्या वश झालें होतें. तरी आपल्या वृत्तीचा चंचलपणा बाहेर पडूं नये, ह्मणून पूर्वीं आरंभिलेला बकुळीच्या फुलांचा हार गुंफावयाचा कांहीं राहिला होता तो मोठ्या कष्टानें मीं शेवटास नेला. इतक्यांत, भालदार, प्यादे, खोजे, बरोबर घेऊन हत्तिणीवर बसून ती चंद्रवदना शहराच्या मार्गाकडे चालती झाली. तेव्हां तिनें—

**वळवुनि मुखकमलातें, पाहुनियां मज पुनःपुन्हा जातां,**
**अमृतविषें लावुनि कीं कटाक्ष हृदयांत रोंविला, तातां! १**

**नये जी शब्दांनीं कथन करितां स्पष्ट मजला,**
**जयेचा यापूर्वीं अनुभव कधींही न घडला,**
**अशी वृत्ती चित्तीं प्रकटुनि विवेकास पळवी,**
**करी संतापातें, मज निबिड मोहांत बुडवी. १**

आणखी,

**पुढें माझ्या वस्तू असुनिहि मला स्पष्ट न दिसे,**
**मनीं अभ्यस्तांचें स्मरण विषयांचेंहि न वसे;**
**ज्वरःशांती चंद्रीं, हिमजल हृदीं वा, नच घडे,**
**अति व्यग्रत्वातें धरुनि, मन मोहामधिं गडे. १**

**कलहंस**—(स्वगत) ह्याचें मन कोणीं स्त्रीनें आपणाकडे बळकट ओढून घेतलें आहे वाटतें. काय? ती स्त्री मालतीच तर नसेल?

**मकरंद**—(स्वगत) काय हो हा प्रीतीचा सपाटा! आतां काय, स्त्रीच्या नादीं असा पडूं नको, विवेक कर, असा ह्याला उपदेश करूं? अथवा—

**याचें तों वय नूतन प्रकट हें, हा काम ओढी गुणा**
**चापाच्या; मन आंवरीं, विकृतिच्या दावूं नको तूं खुणा;**
**ऐसा हा उपदेश यास करणें हें व्यर्थ हो, जाणता,**
**कामाचें बळ मोडिता सबळ तो आहे असा कोणता? १**

(उघड) सख्या, तिचें नांव, गांव, कुळ, शीळ, तुला कांहीं कळलें नाहीं?

---

१ हे मित्रा.

**माधव**—सख्या ऐक. जेव्हां ती अंबारींत बसूं लागली, तेव्हां तिच्या सख्यांपैकीं एक सखी अमळशी थांबून बकुळीचीं फुलें जमा करित करित, मी बसलों होतों तेथें जवळ येऊन मला नमस्कार करून, फुलांच्या हाराच्या मिषानें मला ह्मणाली कीं, 'हे भाग्यवंता! *सुश्लिष्टगुणतेमुळें तुमच्या सुमनांचा संनिवेश फार सुंदर झाला आहे. आमच्या राजकन्येची ह्या हारावर फारच मर्जी बसली आहे. कारण, हा हार पाहून तिला ह्या †कामाची नवीनच माहिती झाली. तर हा हार आमच्या राजकन्येच्या गळयांत पडो, आणि ह्या चातुर्याची कृतार्थता होवो; व घडणारानें हा घडण्याविषयीं जी इतकी करामत खर्चिली आहे, ती सफळ होवो.

**मकरंद**—(स्वगत) कायहो चातुर्य हें?

**माधव**—मग ही कोणाची कोण असें मीं त्या सखीस विचारल्यावरून तिनें मला सांगितलें कीं, अमात्य भूरिवसूची ही कन्या असून हिचें नांव मालती असें आहे. आणि आपण तिच्या अत्यंत मर्जीतली सखी, आपलें नांव लवंगिका.

**कलहंस**—( हर्षानें स्वगत ) हः हः हः! मालती काय? तर मग मदनानें आपली तरवार गाजवावयास फारच सुंदर स्थान पाहिलें ह्मणावयाचें. आतां झाली आमची फत्ते!

**मकरंद**—(स्वगत)अमात्य भूरिवसूची कन्या काय? तीतर मोठ्याच कुळांतली आहे. आणखी, भगवती कामंदकी ही नेहमीं मालतीच्या गोष्टी बोलून तिला फार वाखाणित असते. पण राजा तिला नंदनासाठीं मागत आहे, अशी लोकांत बोलवा आहे.

**माधव**—लवंगिकेनें माझ्याजवळ मागितल्यावरून मीं आपल्या गळयांतून हार काढून तिला दिला. यावेळीं मालतीच्या मुखाकडे पहाण्यांत माझें चित्त गुंतल्यामुळें हार गुंफण्याकडे लक्ष्य नव्हतें; ह्मणून त्याच्या एका बाजूचीं फुलें वांकडींतिकडीं लागलीं गेलीं होतीं; ह्यामुळें तो हार चांगलासा झाला नव्हता; तरी तिनें महाप्रसाद ह्मणून तो घेतला. पुढें यात्रेमुळें जिकडे तिकडे माणसांची गर्दी होऊन तिची माझी चुकामूक झाली. नंतर मी इकडे आलों.

---

* माळेचा गुण ह्मणजे सूत्र. सुश्लिष्ट ह्मणजे मऊ असल्यामुळें सुमनांचा सन्निवेश ह्मणजे फुलांची गुंफणी चांगली झाली आहे; दुसरा अर्थ उत्तम मनें ज्यांचीं अशा तुह्मा दोघांची गांठ समसमान गुणांनीं रमणीय झाली आहे. † कामाची—मदनाची, व कार्याची.

**मकरंद**—सख्या, मालतीविषयीं जशी तुझी प्रीति आहे, तशीच मालतीचीहि तुझ्यावर आहे, हें दिसून आलें. हें परस्पर संबंध होण्यास अनुकूळ आहे. तिच्या मुखावरील पांढुरकी, ग्लानि, इत्यादि चिन्हांनीं सुचविलेली विरहव्यथा तिला तुजविषयींच झाली असावी. बरें, पण कायरे, तिनें पूर्वी तुला कोठें बरें पाहिलें असावें? आपल्या तर बुवा कांहीं लक्ष्यांत येत नाहीं. पहा, अशा कुलीन व सुशील कुमारिका एकावर अंतःकरण ठेवून दुसऱ्यास प्रीतीचा डोळा कदापि दाखवित नसतात. आणखी—

**सखी तिच्या पाहुन एकमेकी**
**परस्परें खूण करूनि, एकी[1]**
**तुझी तिची, सूचवितात झाली**
**पूर्वी असे; तूं तरि भाग्यशाली! १**
**कोणाचा कोणी हा येथें, आहे, असें सख्या वदती,**
**चतुर सखींचें वचनहि दावी तत्प्रेम पूर्ण तुजवरती. १**

**कलहंस**—( प्रवेश करून तसबीर पुढें करून ) ही तसबीर पहा!

( माधव आणि मकरंद ती तसबीर पाहतात. )

**मकरंद**—कलहंसका, कोणींरे काढली ही माधवाची तसबीर?

**कलहंस**—ज्या मनुष्यानें ह्यांचें हृदय आपणाकडे ओढिलें आहे, त्यानेंच!

**मकरंद**—हं हं, मालतीनें काय?

**कलहंस**—होय, तिनेंच!

**माधव**—सख्या मकरंदा, खरा तुझा तर्क. तूं मोटा चतुर आहेस!

**मकरंद**—कलहंसका, ही तसबीर तुला कोठून मिळाली रे?

**कलहंस**—मला ही मंदारिकेपासून मिळाली. मंदारिकेला लवंगिकेपासून मिळाली.

**मकरंद**—मालतीनें माधवाची तसबीर कां काढिली, हें कांहीं मंदारिकेनें तुला सांगितलें आहे?

**कलहंस**—होय, वियोगदुःख क्षणभर विसरावें ह्मणून!

**मकरंद**—सख्या माधवा, आतां सर्वप्रकारें निश्चित ऐस.

---

१ मित्रत्व, प्रेम.

**तुझ्या नेत्राला ती शशिरुचिंच आनंदजननी,**
**तिच्याही चित्तीं तूं असशि भरला, धन्य जननी**
**तुझी ! तत्प्राप्ती हो तुज ह्मणुनि धातो, रतिपती,**
**प्रयत्नें दोघेही झटति; समजें आपुलिच ती !** १

पण माधवा, तुला जिनें इतकें मोहित केलें, ती फारच देखणी असेल, ह्यांत संशयच नको. यासाठीं तूं मालतीचें चित्र काढून दाखीव बरें, ह्मणजे तिचें रूप आमच्याहि दृष्टीस पडेल.

**माधव**—जसें मित्रास आवडेल तसें. (कलहंसकास) अरे, चित्र काढावयास पाटी आणि कलम आण.

**कलहंस**—( पाटी, कलम आणून ) हीं घ्या महाराज.

**माधव**—( चित्र कांहींसें काढून ) सख्या मकरंदा, चित्र काढणें पुढें चालत नाहीं. पहा—

**वारंवार निघोनि झांकित असे हें बाष्प नेत्रांप्रती,**
**तीची मूर्ति मनांत येउन, हरी मद्देहभानाप्रती;**
**काढावी तरि, हस्त घर्मसलिलें हो व्याप्त, कंपोद्गमें**
**बोटें कांपति, काय मी करुं अतां, कांहीं न मातें गमे !** १

असें जरी आहे, तरी ज्या अर्थी आरंभिली आहे, त्या अर्थी कशीतरी संपवितों. ( बऱ्याच वेळानें तसबीर काढून दाखवितो. )

**मकरंद**—( तसबीर पाहून ) अहाहा ! काय तरी लावण्य हें ! सख्या, एकूण, तुझें अंतःकरण इतकें लगटून गेलें, हें योग्य ठिकाणींच गेलें ! (कौतुकानें) काय हो ? लागलीच श्लोकहि करून हा खालीं लिहिला आहे ? भले शाबास माधवा !

**स्वभावें चित्तातें मधुर गमुनी, हर्ष करिती,**
**दुजे ऐसे कोट्यावधि विषय सृष्टींत असती;**
**तथापी श्यामा ती जइं निरखिली, तोंच मजला**
**खरा जन्मामध्यें शुभ दिन असा एक गमला !** १

---

१ चंद्रकांति. २ आनंद देणारी. ३ होवो. ४ दैव. ५ काम. ६ प्रेमाश्रु. ७ घामाच्या पाण्यानें. ८ कांप सुटण्यानें. ९ सुचे.

( इतक्यांत त्वरेनें मंदारिका येते. )

**मंदारिका**—कलहंसका, तूं येथें आलास, हें मीं तुझ्या पावलांवरून ओळखलें! ( माधव आणि मकरंद ह्या दोघांनां पाहून, लाजून स्वगत ) काय? हे दोघेहि येथेंच आहेत! ( जवळ येऊन नमन करिते. )

**दोघे**—मंदारिके, ये, बैस.

**मंदारिका**—( बसून ) कलहंसका, मघां मीं दिलेली तसबीर कोठें आहे? दे ती परत पाहूं!

**कलहंस**—( तसबीर पुढें करून ) ही घे.

**मंदारिका**—( पाहून ) ह्या पाटीवर मालतीचें चित्र आहे. कलहंसका, हें कोणीं व काय ह्मणून काढिलेंरे?

**कलहंस**—मालतीनें ज्याकरितां ज्याचें चित्र काढिलें, त्यानेंच त्याचकरितां तिचें काढिलें!

**मंदारिका**—(हर्षानें) अहाहा! हें चित्र पाहिल्यानें ब्रह्मदेवाच्या कर्तबगारीचें फल दिसून आलें.

**मकरंद**—मंदारिके, ह्या चित्राविषयीं तुझा प्रियसखा जें जें सांगतो, तें सर्व खरें आहे काय?

**मंदारिका**—होय महाराज, सारें खरें आहे.

**मकरंद**—पूर्वीं मालतीनें माधवास कोठें पाहिलें होतें?

**मंदारिका**—लवंगिका ह्मणते कीं, तिनें आपल्या महालाच्या खिडकींतून रस्त्यांतून जातांना त्याला पाहिलें.

**मकरंद**—सख्या माधवा, आपण बहुतकरून अमात्याच्या वाड्यापुढील बाजारांतून नेहमीं जात येत असतों खरे. त्यावरून मंदारिका जें सांगते, तें जुळतें.

**मंदारिका**—भगवान् कामदेव ह्याचें हें उत्तम चरित्र माझ्या प्रियसखी लवंगिकेला कळवण्याला जातें; आपला निरोप असावा.

[ मंदारिका तसबीर घेऊन जाते.

**मकरंद**—सख्या, सूर्य मध्यान्हीं आला, ऊन फार झालें आहे, तर चल घरीं जाऊं. ( उठून इकडे तिकडे फिरतात. )

**माधव**—मला वाटतें,

**मुग्धाक्षीच्या[1] सखींनीं बहुविध लिहिल्या पत्रवल्ली[2] विचित्रा**
**प्रातःकाळीं कपोलीं[3], भिजुनि पुसति त्या घर्म येऊनि गात्रा;**
**ऐशी उष्णांशुतापें[4] करुनि चतुरता व्यर्थ झाली तयांची,**
***चित्तीं येतें, न जाणो, स्थिति घडल अशी सर्व माझ्या श्रमाची! १**

आणखी,

**कुंदांतें सविकासें[5] तूं करुनियां, ये मंदसा मारुता[6]!**
**पद्मांचे मकरंदबिंदु अवघे घेऊनियां मागुता;**
**लोलाक्षीमृदुकायसंगें[7] करुनि स्पर्शें करीं शांतसें**
**माझें अंग अनंगतप्त[8]; तुजला वंदूनि प्रार्थीतसें. १**

**मकरंद**—( स्वगत )

**सुकुमार माधवाच्या हृदयीं स्मर[9] बाण मारितो तैसा,**
**खांचेवरि तृण पेरुनि, कपटें करिशिशुसें[10] पारधी जैसा. १**

असो. ह्या प्रसंगीं भगवती कामंदकीवांचून आमचें संकट कोण दूर करणार आहे? तर तिलाच शरण जावें.

**माधव**—( स्वगत ) काय आश्चर्य हें!

**विकसित[11]कनककमलसमवदना नयनापुढेंच ती दिसती**
**जिकडे पाहें तिकडे! उपासकाला जशी अनादिसती[12]. १**

( उघड ) मित्रा, आतां माझी तर अवस्था अशी झाली! पहा—

**बोलायास अशक्य, अंग पिळुनी टाकीतसे ताप हा,**
**मोहें इंद्रियशक्ति कुंठित असे, कांहीं सुचेना पहा !**
**अंगाला बहु शाहरे उठति हे, अत्युत्कटा वाढती**
**उत्कंठा, मन हें जळे, सतत मच्चित्तीं वसे गाढ ती. १**

[ सर्व जातात.

**[ बकुलवीथीनामा प्रथम अंक समाप्त. ]**

---

१ मालतीच्या. २ वेलबुट्टी. ३ गालांवर. ४ सूर्याच्या उष्णानें. ५ प्रफुल्लित. ६ वायो. ७ मालतीच्या मऊ शरीरास स्पर्श. ८ कामसंतप्त. ९ मदन. १० हत्तीच्या छाव्यास. ११ प्रफुल्ल सुवर्णकमळासारखें जिचें मुख अशी ती मालती. १२ पार्वती. * मालतीच्या प्राप्तीविषयीं मीं मनांत जें मनोराज्य करित आहें, तेंहि असेंच एखादेवेळेस विघडून जाईल कीं काय, कोण जाणे?

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—भूरिवसूच्या वाड्यांतील संगीतशाळा, मेघमाला आणि वासंतिका नांवाच्या मालतीच्या दोघी दासी प्रवेश करितात. ]

**मेघमाला**—गडे वासंतिके, संगीतशालेजवळ अवलोकितेबरोबर कसल्याग गोष्टी बोलत होतीस ?

**वासंतिका**—सखे, आणखी दुसरें काय असणार ? माधवाचा सखा मकरंद ह्यानें मदनोद्यानांतील सगळा वृत्तांत भगवतीच्या कानांवर घातला.

**मेघमाला**—मग पुढें काय झालें ?

**वासंतिका**—मग मालतीस भेटण्याच्या इच्छेनें, ती कोठें आहे हें पाहून येण्यासाठीं भगवतीनें अवलोकितेस पाठविलें. मी अवलोकितेला सांगितलें कीं, मालती लवंगिकेसहवर्तमान एकांतीं बसली आहे.

**मेघमाला**—सखे, बकुळीचीं फुलें वेंचतें असा बहाणा करून लवंगिका मदनोद्यानांत मार्गे राहिली होती, ती घरीं आली कायग ?

**वासंतिका**—होय, आली. ती मदनोद्यानांतून माघारी येतांच बाकी साऱ्या दासींस एकीकडे करून तिचा हात धरून मालती वरच्या गच्चीवर गेली.

**मेघमाला**—एकून, आतां ती आपल्या प्रियकराच्या गोडगोड हितगुजाच्या गोष्टी बोलत मोठ्या सुखांत बसली असेल, नाहींका ?

**वासंतिका**—( उसासा टाकून ) तिला बापडीला कोठलें सुख बाई ? आज मदनोद्यानांत माधवाची चमत्कारिकपणें भेट झाल्यापासून तिचें मन फारच दुःखित झालें आहे. कारण, सकाळींच महाराजांनीं अमात्यांस सांगून पाठविलें आहे कीं, नंदनास मालती द्यावी. मग अमात्यांनीं महाराजांस अशी विनंति केली—

**मेघमाला**—काय, काय बरें विनंति केली ?

**वासंतिका**—'महाराज, माझ्या कन्येवर सर्व प्रकारें आपला अधिकार आहे; आपल्या कन्येचा विचार आपण पाहिजे तसा करावा!' आणि ही गोष्ट मालतीच्या कानांवर गेली असल्यामुळें तिला माधवाविषयीं जें प्रेम उत्पन्न झालें आहे, तें मरेतोंपर्यंत तिच्या हृदयास सतत व्यथा करण्यास मात्र कारण झालें. आतां ती बापडी ह्या जन्मांत संसारसुखास अंतरली !

**मेघमाला**—मला वाटतें, ह्या प्रसंगीं भगवती कामंदकी, आपल्या बुद्धीचा कांहींतरी प्रभाव दाखवून हें संकट खचीत दूर करील!

**वासंतिका**—खा मनचे मांडे! तुला कसलें वाटतें आणि ती गोष्ट कसली होते? बरें, आतां चल, आपण आपल्या कामास जाऊं.

[ जातात.

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—भूरिवसूच्या वाड्याची गच्ची. मालती आणि लवंगिका बोलत बसल्या आहेत, असा प्रवेश. ]

**मालती**—हूं, सखी, मग पुढें काय झालें?

**लवंगिका**—मग त्या भाग्यवंतानें मलाहि बकुळीच्या फुलांचा हा हार दिला. ( मालतीला हार दाखविते. )

**मालती**—( हार घेऊन आनंदानें त्याकडे पाहून ) सखी, ह्या हाराची ओंवण एका बाजूस बरोबर आहे, परंतु दुसऱ्या बाजूस ही अशी वांकडीतिकडी कां बरें झाली?

**लवंगिका**—( हंसून ) ह्याचें कारण आपणच आहां बरें!

**मालती**—कोण मी? मी कशी? मींग काय केलें बाई?

**लवंगिका**—आपण त्याच्या दृष्टी पडून त्या बापड्यास वेडावून टाकिलें! मग त्याचें हाराकडे मन कसें लागावें?

**मालती**—सखे, लवंगिके, दुसऱ्याच्या चित्ताचें समाधान होण्यासारखें बोलावें, असा तुझा स्वभावच आहे!

**लवंगिका**—सखी, ह्यांत समाधान होण्यासारखें कायग बोलल्यें? बरें तूंच सांग, तूं जेव्हां मदनोद्यानांत उभी होतीस, तेव्हां मंद वायूनें कंपित अशा कमळासारखे सुशोभित असे त्याचे डोळे तुझ्या मुखाकडे वारंवार लगटत असतां, तो संकोचून, त्यांस बळेंच ओढून हार गुंफण्याच्या मिषानें खालीं करी, आणि आपलें चित्त हार गुंफण्याकडे आहे असें दाखवून क्षणोक्षणीं चोरून काण्या दृष्टीनें तुझ्याकडे पाही, आणि तो तसा पाहत असतां, एक भुंवई वर चढून जशी काय ती मदनाच्या हातांतील कमानच, अशी दिसे! हा सर्व प्रकार तूं स्वतः पाहिला नाहीं का? तुला तें सर्व समजलें आहे, पण उगीच आपलें लोकांकडून बोलवावयाचें झालें!

**मालती**—( लवंगिकेस आलिंगून ) पण प्रियसखी, लवंगिके! तूं ह्मणतेस तसें असेल, किंवा त्याचे ते स्वाभाविक विलास असून क्षणभर तें पाहणाऱ्या आपणांस उगीच भ्रांतीनें तसें वाटत असेल? कोणीं सांगावें, दुसऱ्याच्या मनांत खरोखरी काय आहे तें?

**लवंगिका**—( हंसून व किंचित् टोंचून ) मला वाटतें, त्या समयीं आपण जे हावभाव केले, तेहि उगीच स्वभावतः झाले असतील, नाहीं का?

**मालती**—( लाजून ) बरें बरें! पुढें काय झालें?

**लवंगिका**—मग सर्व यात्रा माघारी फिरली, तेव्हां एकदम दाटी होऊन तो दिसेनासा झाला. नंतर मग मी तेथून परत फिरलें आणि येतांयेतां मंदारिकेच्या घरीं आलें. आज सकाळीं माधवाची तसबीर मीं तिच्याकडे दिली होती—

**मालती**—कां बरें?

**लवंगिका**—कलहंस नांवाचा माधवाचा हुजऱ्या तिच्याशीं प्रेमानें वागतो, तेव्हां मंदारिका ती तसबीर त्याला सहज दाखवील, आणि कलहंसाकडून अर्थातच ती माधवाच्या दृष्टीस पडेल. गडे मालती, ऐकलेंका, मंदारिकेनें मला एक आनंदाची गोष्ट कळविली आहे.

**मालती**—(स्वगत) त्या कलहंसानें ती तसबीर माधवास दाखविली असेल? ( उघड ) सखी, कोणती तुझ्या आनंदाची गोष्ट?

**लवंगिका**—आनंदाची गोष्ट हीच कीं, माधवाचें प्रेम तुजवर आहे; परंतु त्याचा मनोरथ सफल होणें कठीण, ह्मणून तुझी तसबीर पाहून तुझ्या विरहाची वेदना कांहीं कमी करावी, अशा अभिप्रायानें त्यानें तुझी तसबीर काढिली आहे. ती मंदारिकेच्या हातीं आली आणि तिनें माझ्याजवळ दिली. ( तसबीर दाखवून ) ही पहा.

**मालती**—(आनंद पावून उसासा टाकून) माझें मन किती अविश्वासी तरी? अझून मला भरंवसा येत नाहीं! मनांत येतें कीं, ही सर्व मला उगीच भ्रांति होत असेल. तसबिरीखालीं हीं काय बरें अक्षरें लिहिलीं आहेत? ('स्वभावें चित्तातें' हा पूर्वींचा श्लोक वाचून आनंदानें ) भाग्यवंता! तुझी कविता मधुर आहे हें तर ठीकच आहे; पण तुझें दर्शन तत्काल मधुर असून परिणामीं तें पराकाष्ठेच्या दुःखास कारण होतें! ज्या कन्यांनीं तुला मुळींच पाहिलें नाहीं,

किंवा तुला पाहूनहि ज्या आपलें मन आपल्या स्वाधीन ठेवण्यास समर्थ होतील, त्या भाग्यवान् खऱ्या !

**लवंगिका**—सखे, इतकें झालें असूनहि तुझ्या मनाचें समाधान होत नाहीं ?

**मालती**—सखे, इतकें तें काय झालें ग ?

**लवंगिका**—अग, नव्या जाईच्या फुलासारखी सुकुमार, आणि देंठापासून तुटून पडलेल्या अशोकाच्या कोमल पल्लवासारखी नाजूक अशी तूं, ज्याच्याकरितां इतकें दुःख पावतेस, त्या माधवालाहि मदनापासून पराकाष्ठेची पीडा होत आहे !

**मालती**—तो भाग्यवंत खुशाल असो ! माझें अंतःकरण स्वस्थ होणें दुर्घट आहे. (डोळ्यांत पाणी आणून) सखे, आज तर माझी अवस्था कठीणच आहे !

**मदंगीं तत्प्रीती पसरत असे तीव्रविषशी,**
**विधूमाग्निज्वाला धगधगित तापप्रद तशी,**
**मथोनी सर्वांगें ज्वरसम बहु व्याकुळ करी,**
**मम त्राणीं माता, जनक, न समर्थ क्षणभरी.** १

**लवंगिका**—सखे, चांगल्या माणसांच्या स्नेहाची गोष्ट अशीच आहे ! त्या माणसांचा समागम असला ह्मणजे पराकाष्ठेचें सुख होतें, व त्यांचा वियोग झाला असतां तसेंच पराकाष्ठेचें दुःख होतें. तसेंच, सखे मालती, तूं खिडकींतून उगीच क्षणभर त्याला जातांयेतां पाहिलें ह्मणजे तुझी अशी अवस्था होई, कीं, चंद्रोदय झालेला पहातांच, तुला एखादी मोठी होळी भडका पेटतांना पाहिल्याप्रमाणें वाटे, व तुझा विरहाग्नि भडकून तूं वांचतेस कीं नाहीं, असा आह्मांलाहि धाक पडे ! त्यांतून तूं आज त्याला विशेष पाहिलें आहे, व तुझ्याप्रमाणें त्याचेंहि प्रेम तुजवर आहे, हें तुला कितीएक गोष्टींवरून कळलें आहे, तेव्हां आज तुला इतकी व्यथा व्हावी, ह्यांत काय नवल आहे ? सखे, आपल्या मनासारखा, असा उत्तम गुणवान् पति प्राप्त झाला असतां, त्याच्या समागमाविषयीं यत्न करावा असें मला वाटतें. संसारांत असा लाभ दुर्लभ आहे. ह्यास्तव तूं तसें केल्यानें लोक तुझ्या कृत्याची वाखाणणीच करतील !

**मालती**—तुला मालतीचा जीव मात्र प्यारा आहे, तिच्या नांवलौकिकाचें कांहीं झालें तरी त्याची पर्वा नाहीं, असेंचना ? अग, साहसकर्म करण्याविषयीं मन वळविणारे ! जा, निघ येथून ! ( डोळ्यांत अश्रु आणून ) अथवा, तुला तरी

काय बोल लावावा? हा सारा माझाच अपराध होय! मींच वारंवार त्याच्याकडे कां पाहावें? आणि जिवास चटका लावून घेऊन मनाची दृढता कमी कां करावी? पहिल्यानें मींच कन्याजनास अयोग्य अशा रीतीनें वागून मूर्खपणा केला; त्याचें हें फळ भोगित आहें. असें झालें आहे, तरी लवंगिके, तुला खचीत सांगतें—

**आकाशीं पूर्ण चंद्र प्रतिरजनि जळो, काम जाळो मदंग,**
**येवो मृत्यू सखे! कीं मज, तरि न ढळे धैर्य माझें अभंग;**
**शुद्धा माता मला ती प्रिय, जनक बहु श्रेष्ठ, सद्वंश जेंवी,**
**मच्चित्तीं जो असे तो प्रिय मज न असे, प्राणही मान्य तेंवी.** *१

**लवंगिका**—( स्वगत ) आतां येथें कोणती बरें युक्ति लढवावी?

( इतक्यांत द्वारपालिका येते. )

**द्वारपालिका**—ताईसाहेब, भगवती कामंदकी आली आहे.

**दोघी**—हं हं, कोण भगवती कामंदकी! कां बरें येणें केलें?

**द्वारपालिका**—( मालतीस ) बाईसाहेबांच्या समाचारासाठीं.

**दोघी**—मग विलंब कां? येऊं दे.

( द्वारपालिका बाहेर जाते. मालती तसबीर लपविते. )

**लवंगिका**—( स्वगत ) वाहवा! मला व्हावें होतें, तेंच झालें!

( इतक्यांत अवलोकितेसहवर्तमान कामंदकी येते. )

**कामंदकी**—(स्वगत) शाबास, मित्रा भूरिवसो, शाबास! 'आपल्या कन्येचा विचार आपण पाहिजे तसा करावा,' असें जें महाराजांस तूं उत्तर दिलें, तें फार समर्पक दिलें! तें उभयलोकांस अविरुद्ध आहे. आणखी, आज मदनोद्यानांतील वृत्तांत ऐकून तर आमच्या कार्यास दैव अनुकूळ झालें आहे, असें वाटतें. बकुळ पुष्पांचा हार आणि तसबीर ह्यांची मौजेची गोष्ट कळल्यावरून तर मला फारच आनंद झाला. लग्नाच्या कामांत वधूवरांची परस्परांवर प्रीति असणें, ही पराकाष्ठेच्या समाधानाची गोष्ट आहे. अंगिराऋषीनें ह्मटलें आहे कीं, वाणी, मन आणि नेत्र ह्यांची प्रवृत्ति ज्याच्याकडे नेहमीं असते, त्याच्याशीं विवाह केला असतां सर्वदा कल्याणाची वृद्धि होते.

---

* आईबापांचे कुळाच्या नांवलौकिकापेक्षां मला माधव प्रिय नाहीं व त्या नांवलौकिकाकरितां प्राणहि गेला तरी चिंता नाहीं!

**अवलोकिता**—( कामंदकीस हळूच ) ही मालती बसली आहे, पहा.

**कामंदकी**—( पाहून )

**क्षीणांगी जरि ही तरी दिसतसे रम्याचि केळी जशी,**
**किंवा क्षीण असोनि मूर्ति शशिची आनंद देते तशी**
**नेत्रांला; मदनाग्निनें जरि दशा ऐशी हिची होतसे,**
**चित्ताला रमवीतसे, तशिच ही कंपाप्रती देतसे.** १

आणखी,

**मुखीं पांडुता, लागली धूलि गाला,**
**तरी शोभते ही विशेषेंचि बाला!**
**स्वभावें जिथें रम्यता होय साची,**
**कृती शोभते त्या स्थळीं मन्मथाची.** १

अथवा संशय नको! मला वाटतें, ही आपल्या हृदयांत संकल्पानें निर्मिलेल्या प्रियाच्या समागमसुखास अनुभवित आहे. त्याचीं हीं चिन्हें पहा—

**वस्त्रग्रंथि सुटे, सकंप कुच हे, बाहुद्वय श्रांतसें,**
**अंगस्तंभ, बहु स्फुरे अधर हा, चक्षू ससंकोचसें,**
**घर्माचा किति लोट, दाट उठती रोमांच गालावरी,**
**मूर्छा कीं हिस चेतना न समजे, ही कावरीबावरी.** १

( कामंदकी जवळ जाते. लवंगिका मालतीस डंवचते.
त्याबरोबर मालती दचकून उठते. )

**मालती**—भगवतीला वंदन करितें.

**कामंदकी**—हे महाभागे! तुला इष्टफल प्राप्त होवो.

**लवंगिका**—हें येथें आसन आहे, भगवतीनें बसावें.

( सर्व बसतात. )

**मालती**—कां माई, बरें आहेना?

**कामंदकी**—( उसासा टाकून ) हो, बरेंच आहे!

**लवंगिका**—( स्वगत ) हं, हा कपटनाटकाच्या प्रस्तावनेस आरंभ झाला! ( उघड ) बोलतांना गळा दाटून येतो, उसासे टाकतां, आपलें भाषणहि कांहीं निराळेंच दिसतें, तर भगवतीस इतका उद्वेग होण्याचें कारण काय बरें झालें असावें?

**कामंदकी**—ज्यानें भगवें घेतलें, त्यानें खरें ह्मटलें ह्मणजे अति लोभांत पडूं नये! पडलें कीं, असें दुःख होतें!

**लवंगिका**—कसें बरें?

**कामंदकी**—अग–तुला माहीत नाहीं का? (मालतीकडे बोट दाखवून)

**स्वभावें वपू हें विलासें नराचें**
**हरी चित्त, निर्बाध अस्त्र स्मराचें;**
**अयोग्या वराच्या जरी जाय हातीं,**
**हिच्या रूपसंपत्तिची होय माती!** १

(मालती तोंड वाईट करिते.)

**लवंगिका**—होय, असें आहे खरें. राजाच्या ह्मणण्यास रुकार देऊन अमात्यानें इला नंदनास देण्याचें कबूल केलें, हें ऐकून सर्व लोक अमात्यास दूषण देत आहेत.

**मालती**—(स्वगत) कसें हो हें? तातानें मला राजाच्या पायीं बुडविलें!

**कामंदकी**—काय हें आश्चर्य!

**टाकोनी गुणवान्, कसें करितसे अन्यासि कन्यार्पण!**
**किंवा स्वार्थपरायणांस कुठलें कन्यादयाळूपण[1]!**
**ऐसें भासतसे मला, नृपतिच्या मित्रा तया नंदना**
**जांवाई करुनी जडेल ममता, हें वाटतें तन्मना.** १

**मालती**—(स्वगत) एकून, बाबांस राजाची मर्जी संभाळणें हें अधिक वाटलें, मालती कांहींच नाहीं अं?

**लवंगिका**—आपण ह्मणतां हेंच खरें; असें जर नसतें, तर असल्या मेल्या खेमड्या, थेरड्या, नवऱ्याला आपली एकुलती एक मुलगी अमात्य कां देता?

**मालती**—(स्वगत) शिव शिव! ईश्वरा, केवढी ही मजवर आग कोसळली! हें दुःख मी कसें सोसूं? कायहो हतभाग्य मी!

**लवंगिका**—माई कामंदकी, तुह्मी तरी दया करून ह्या माझ्या प्राणसखीस जिवंतमरणापासून तारा! ही तुमची तरी धर्मकन्याच आहे?

**कामंदकी**—अग वेडे, येथें माझ्या भगवतीपणास काय करतेस? माझ्या हातीं काय आहे? कन्येचें बरेंवाईट करण्याचें बहुतकरून बापाच्या किंवा

---

१. कन्येची माया.

दैवाच्या स्वाधीन असतें. आतां ज्यांनां प्राचीन कथा ठाऊक आहेत, ते असें सांगतात कीं, शकुंतलेनें दुष्यंत राजास स्वतः वरिलें; उर्वशी अप्सरेनें पुरूरव्यास स्वतः वरिलें आणि वासवदत्तेला तिच्या पित्यानें संजय राजास देऊं केलें असतां, तिनें स्वतः होऊन उदयन राजास वरिलें. असें जरी आहे, तथापि हें साहसच आहे ! ह्मणून इनेंहि असेंच करावें, असें तुझ्या सखीला सांगणें आह्मांसारख्यांस उचित नाहीं.

**राजप्रिय सचिवातें अमात्य कन्यार्पणें सुखी राहो,**
**दुर्दर्श[1]राहुतुल्या, त्याला ही शशिकलासमा लाहो[2]. १**

**मालती**—( डोळ्यांत पाणी आणून स्वगत ) हा ताता ! तूं मजविषयीं असा निर्दय झालास, तेव्हां भोगाच्या तृष्णेनें कोणासहि सोडिलें नाहीं, हेंच खरें आहे !

**अवलोकिता**—भगवतीस इकडे येऊन फार वेळ झाला, हें मीं सुचवूं नये, परंतु त्या भाग्यवंत माधवाच्या शरीरीं आज समाधान नाहीं, ह्मणून सांगतें.

**कामंदकी**—होय, खरेंच, बराच उशीर झाला ! मला तिकडे लौकर गेलें पाहिजे. ( मालतीस ) मी जातें आतां, वत्से, मला निरोप दे.

**लवंगिका**—( मालतीस एकीकडे ) गडे मालती, आतां आपण भगवतीपासून त्या महाभाग माधवाची कुळकथा समजून घेऊं.

**मालती**—सखे, मला तर ती समजून घेण्याची अत्यंत उत्कंठा लागली आहे.

**लवंगिका**—(उघड) भगवति, ज्यावर आपण इतकी माया करितां, इतका थोर तो माधव आहे तरी कोण ?

**कामंदकी**—ती कथा फारच मोठी आहे, आणि ( उसासा टाकून ) ती सांगण्याचा येथें प्रसंगहि नाहीं ! तेव्हां उगीच मला कशाला विचारतेस ? जाऊं दे मला आतां, उशीर फार झाला.

**लवंगिका**—भगवति, कृपा करून सांगावेंच. आह्मांला तें समजण्याची फार उत्कंठा लागली आहे.

**कामंदकी**—तुमची एवढी उत्कंठाच असेल, तर सांगतें, ऐक पोरी. विदर्भराजाचा देवरात ह्मणून एक प्रधान आहे. तो सर्व धुरंधर पुरुषांचा शिखामणीच असल्यामुळें त्याची कीर्ति सर्व भुवनांत आज गाजत आहे,

---

१ कुरूप. २ मिळो.

व तो कोण व कसा ही सर्व माहिती मालतीच्या पित्यास आहे. त्या दोघांनीं एकाच गुरूजवळ विद्याभ्यास केला होता.

सन्मंगलगृहचि, जे सुकृतप्रसारें
कीर्तीं करूनि करिती जग शुभ्र* सारें;
कोणासही न समजे महिमा जयांचा,
थोडाच संभव जगीं असल्या जनांचा. १

**मालती**—सखे, भगवतीनें ज्याचें नांव घेतलें, त्याच्या गोष्टी बाबा नेहमीं काढित असतात.

**लवंगिका**—सखे, ह्यातारेकोतारे सांगतात कीं, तुझा तात आणि अमात्य देवरात हे सहध्यायी होते.

**कामंदकी**—

पूर्वाचळीं शशि जसा उदयास येतो,
नेत्रोत्सवप्रद जनास तसा, सये ! तो;
सत्कांति, सुंदर, कलानिधि देवराता-
पासूनि जो उपजला जनसौख्यदाता. १

**लवंगिका**—( मालतीला ) सखी, तो माधवच असेलसें वाटतें?

**कामंदकी**—

छंद विद्येचा धरुनि मनीं भारी,
सुखें घरचीं सोडूनि दिलीं सारीं;
बाल असतांही प्रवासा निघाला,
नाहिं मार्गीच्या श्रमालाहि भ्याला. १
उत्तमांहीं तो गुणांहीं विराजे,
रूप त्याचें पाहुनी मदन लाजे;
कीर्ति ज्याची सारिया जगीं गाजे,
अशा ताता पोटिं त्या जन्म साजे. २
राजमार्गी तो सहज जरी जाई,
शरच्चंद्राचा भास मनीं होई;

* कीर्ति शुद्ध ह्मणजे पांढरी आहे, असें ह्मणण्याचा संस्कृत कवींचा संप्रदाय आहे.

**रूप त्याचें देखुनी नगरनारी**
**कामबाणांनीं व्यथित होति भारी ! ३**
**स्वस्व मंदीरीं राहुनी उभ्या त्या,**
**अतिप्रेमें पाहती सौख्यदात्या;**
**भरुनि खिडक्या नील तत्कटाक्षांहीं,**
**गमति खचल्या कीं काय कुवलयांहीं ! ४**

तो देवराताचा पुत्र माधव, मकरंद नामें आपल्या एका मित्रासहवर्तमान सांप्रत ह्या नगरांत नीतिशास्त्र पढण्याकरितां येऊन राहिला आहे.

**मालती**—(आनंदानें लवंगिकेस ) सखी, ऐकलेंना हें ?

**लवंगिका**—सखी, समुद्राखेरीज दुसऱ्यापासून पारिजातक वृक्ष उत्पन्न झाला, असें कोठें तरी झालें आहे का ?

( बाहेर वाद्यांचा गजर होतो. )

**कामंदकी**—अहो, केवढा वेळ गेला हा ? सांप्रतकाळीं—

**वाद्यांचा ध्वनि धीर सांध्यसमयीं होतो, तया ऐकुनी**
**पक्षी निद्रित जे रतिश्रमवशें, निद्रेस ते टाकुनी**
**होती जागृत; आणि हा ध्वनि चढे आकाशमार्गीं जसा,**
**प्रासादावरि जीं निकुंजभवनें त्यांमाजि जातो तसा. १**

चला तर, आतां उठूं. ( सर्व उठतात. )

**मालती**—(स्वगत) कायहो, माझ्या तातानें मला राजाच्या पायीं बुडविलें ! एकून, ताताला राजाची मर्जी संभाळणें हेंच अधिक वाटलें. मालती कांहींच नाहींना ? हा ताता ! तूंदेखील मजविषयीं असा निर्दय झालास ? एकून भोगाच्या तृष्णेनें कोणालाहि सोडिलें नाहीं हेंच खरें. असो. तो महानुभाव मोठा कुलीनहि आहे. समुद्रावांचून दुसऱ्या ठिकाणीं पारिजातक कसा निपजेल, ह्मणून सखी लवंगिका ह्मणाली, तें खरें आहे; पण तो भाग्यवंत पुनः एक वेळ माझ्या दृष्टीस पडेल का ?

**लवंगिका**—अवलोकिते, इकडे ये, आपण ह्या जिन्यानें खालीं उतरूं.

**कामंदकी**—(स्वगत) वाहवा, चांगलें झालें. चतुर दूती पाठवून मालतीचें मन वळविण्याचें जें काम करावयाचें, तें तिऱ्हाईत राहून मींच केलें. पहा, आपल्या बोलण्यानें—

केला,-द्वेष दुज्या वरावरि तिचा, बापावरी संशय,
पूर्वींच्या कथुनी कथा सुचविला मीं आपुला आशय;
वत्साचे गुण आणि थोर कुल हीं वर्णूनि तीच्या मनीं
प्रीती वाढविली; अतां विधि करो जें मान्य हो कीं जनीं. १

[ सर्व जातात.

[ धवलगृहनामा दुसरा अंक समाप्त. ]

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—कामंदकीचा आश्रम. बुद्धरक्षिता प्रवेश करते. ]

**बुद्धरक्षिता**—( इकडेतिकडे फिरून दुसऱ्याशीं बोलल्यासारखें करून )अग अवलोकिते, भगवती कामंदकी कोठें आहे, तुला ठाऊक आहे का?

**अवलोकिता**—( प्रवेश करून ) बुद्धरक्षिते, तुला नाहीं काग ठाऊक, मालतीकडे जाऊन भगवतीला केवढा तरी वेळ झाला! भिक्षा गोळा करण्याची वेळ टळून गेली, तरी भगवती मालतीकडेसच बसली आहे!

**बुद्धरक्षिता**—हं! बरें, तूंग कोणीकडे होतीस?

**अवलोकिता**—भगवतीनें मला माधवाकडे जाऊन त्याला निरोप सांगावयास सांगितला होता; त्याप्रमाणें, त्याला शिवालयाजवळील कुसुमाकर नांवाच्या बागेंत जेथें तीं तांबड्या अशोकाचीं पुष्कळशीं झाडें आहेत किं नाहीं त्यांच्या आसपास जाऊन बसण्यास सांगून आलें. भगवतीच्या निरोपाप्रमाणें माधव तेथें गेला आहे.

**बुद्धरक्षिता**—माधवाला तेथें जावयास सांगण्याचा भगवतीचा काय हेतु बरें?

**अवलोकिता**—अग, आज शिवरात्र आहे, तेव्हां भगवतीबरोबर मालती शिवालयांत जाणार आहे. तेथें गेल्यावर, शिवपूजेकरितां आपल्या हातानें फुलें तोडावीं ह्मणजे सौभाग्यवृद्धि होते, असें सांगून मालतीला लवंगिकेसहवर्तमान बरोबर घेऊन भगवती कुसुमाकर बागेंत जाईल, ह्मणजे अर्थातच परस्परांची दृष्टादृष्ट होईल. हेंच माधवास तेथें पाठविण्याचें कारण आहे, समजलीस? बरें, पण तूंग कोठें चाललीस?

**बुद्धरक्षिता**—माझी प्रियसखी मदयंतिका शिवालयांत जाण्यास निघाली असून तिनें मलाहि बोलाविलें आहे. ह्मणून मीहि भगवतीच्या पायां पडून तिकडेच जाण्यासाठीं आलें आहें.

**अवलोकिता**—बरें, पण कायग, भगवतीनें तुला जें काम सांगितलें होतें, त्याचें कसें काय झालें?

**बुद्धरक्षिता**—भगवतीच्या आज्ञेप्रमाणें, आह्मी एकांतीं अनेक प्रकारच्या हितगुजाच्या गोष्टी बोलत बसलों, ह्मणजे मी मकरंद असा आहे, तसा आहे,

त्याचे गुण असे आहेत, रूप तसें आहे, याप्रमाणें वरचेवर वर्णन करून मकरंदाविषयीं प्रियसखी मदयंतिकेच्या मनांत पुष्कळ प्रेम उत्पन्न केलें आहे. त्यावरून मकरंदाला कधीं एकदा डोळ्यांनीं पाहीन, अशी तिच्या मनांत पराकाष्ठेची उत्कंठा उत्पन्न झाली आहे.

**अवलोकिता**—वाहवा, फार चांगलें! बुद्धरक्षिते, फार चांगलें काम केलेंस!

**बुद्धरक्षिता**—बोलण्याच्या नादांत बराच उशीर झाला बाई! सखी मदयंतिका माझी वाट पहात असेल. मी जातें आतां.

**अवलोकिता**—चल गडे, मलाहि लवकर गेलें पाहिजे.

[ जातात.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—कुसुमाकर उद्यान. कामंदकी पुढें आहे, व मालती आणि लवंगिका मागून चालल्या आहेत, असा प्रवेश. ]

**कामंदकी**—( स्वगत )

**अत्युन्नत स्वभावें, शिक्षेनेंही विनीत असतां हीं[1],**
**केली सखिचें हितगुज ऐकेशी, मीं बहु उपायांहीं. १**

सांप्रतकाळीं,

**माझें सान्निध्य होतां प्रमुदितवदना होतसे, मद्वियोगीं**
**उद्विग्ना, प्रीतिनें ही मज बहु धन दे, राहते मन्नियोगीं[2];**
**एकांतीं सौख्य पावे, गमनसमयिं ही फार लागोनि पायां**
**घाली आणा, ह्मणे कीं 'लवकरि फिरुनी आणखी या! खैर या!' १**

मालती आणि माधव ह्यांच्या विवाहाची आशा धरण्यास दुसरेंहि एक फारच उत्तम कारण झालें आहे.

**शंकुतलाप्रभृतिच्या कथेतें**
**अन्यप्रसंगें कथितां तयेतें,**
**ऐके मदंकीं शिर ठेवुनी ते,**
**नेत्रांस झांकूनि सचिंत होते. १**

---

१ मालती. २ माझ्या आज्ञेंत.

त्यावरून मला वाटतें, माझा अभिप्राय तिच्या मनांत बिंबला आहे. तेव्हां आतां यापुढें मला जें कर्तव्य आहे तें माधवाच्या समक्षच करीन. ( उघड ) मुली, इकडे ये, इकडे ये.

**मालती**—( स्वगत ) कायहो, तातानें मला राजाच्या पायीं बुडविलें ना ?

**लवंगिका**—सखे, ह्या बागेची शोभा पाहिली का कशी आहे ती ?

कटाव.

**कुसुमाकर बाग पाहूं । विश्रांती येथें घेऊं. । ध्रु० ।**

**कोकिलकुल हें कलकल करितें, आम्रतरूच्या शिखरावरतें बसुनी भक्षी सरस मंजरी, कोलाहल तो ऐकुनि उडती मधुकरपंक्ती, इकडे तिकडे जाउनि येउनी मकरंदातें आनंदानें पिउनी, मदानें मत्त होउनी, मंजुल मंजुल गुंजारव करि विकसित चंपक-पुष्पावरुनी, सुगंध घेउनी, मंदमंदसा शीतल वायू, सुखस्पर्श हा, जाणें तुजला आलिंगाया येतो, त्याला स्वीकारीं तूं अपुले पसरुनि बाहू. १.**

**सुंदर हंसा परिपुष्टाच्या, जघनभराच्या उद्वहनानें, मंद गतीनें चरण चालती, श्रमें करुनियां त्वद्वदनीं ह्या घर्मबिंदुच्या पंक्ती येती, त्वन्मुखचंद्रावरि अमृताचे बिंदू जैसे ! श्रम बहु झाले तुजला आतां, रम्य स्थल हें, येथें बैसुनि, आपण सांगूं ये सुखवार्ता; आनंदानें काल नेऊं. २**

(इकडे तिकडे फिरून बसतात, इतक्यांत माधव येतो.)

**माधव**—( हर्षानें ) अहो, भगवती कामंदकी आली ! ही—

**आधीं प्रियेच्या प्रकटूनि, मातें**
**संतप्त चित्ताप्रति ही शमातें**
**देते; जशी वीज निघोन वृष्टी**
**पूर्वी करी शांत मयूरदृष्टी. १**

( पाहून ) अहो, लवंगिकेसहित मालतीहि आली. अहाहा ! काय आश्चर्य हें ?

**या उत्पलनयनेचें मुख बघतां, जाड्य येउनी चित्ता**
**माझ्या द्रव बहु सुटला; जैसा पाहुनि शशीस शशिकांता. १**

वाहवा ! आतां तर ही मालती फारच रमणीय दिसते !

**होतां विमर्द जशि चंपकपुष्पमाला,**
**तैशी तनू इचि दिसे सुकली; सुखाला**
**नेत्रां, मनास मर्द[1], ही बहु देत आहे,**
**मत्कामवन्हि इस पाहुनि पेटताहे.** १

**मालती**—सखी, चल आपण ह्या कुंजवनांत जाऊन फुलें वेंचूं या.

**माधव**—

**प्रियामुखींचें सुस्वर भाषण पहिलें पडतां कानीं**
**जें सुख झालें, वर्णाया तें न शके माझी वाणी !** १
**चित्तीं होउनि अनंगसंभवें[2] तनु[3] रोमांचित होई,**
**वृष्टी होतां कदंब जैसा मुकुलीं[4] व्यापुनि जाई.** २

**लवंगिका**—सखी, चल जाऊं. ( फुलें तोडल्यासारखें करतात. )

**माधव**—(स्वगत) भगवती कामंदकीची घटनाशक्ति मोठी अलौकिक आहे.

**मालती**—सखी, चल, आतां दुसरे ठिकाणचीं फुलें तोडूं.

**कामंदकी**—( मालतीला आलिंगून ) अग, पुरे पुरे, श्रमलीस, आतां पुरे !

**मुलि उमटेना मुखांतुनी तव एकहि शब्द स्पष्ट,**
**बळें पाउलें उचलिशि, परि तुज होती फारच कष्ट.** १
**घर्मबिंदु तव वदनीं विलसति, अरविंदीं[5] मधु[6] जैसे,**
**झांकति नयनें तव पाहुनि, ही तव सखि गालीं हांसे.** २
**प्रियवदनाचें दर्शन केवळ कारण या सर्वांचें,**
**स्पष्ट दिसतसे व्यर्थ चोरिशी गुज मनिंच्या प्रेमाचें.** ३

( मालती लाजते. )

**लवंगिका**—भगवति, आपण अगदीं खरें बोललां.

**माधव**—( स्वगत ) वाः, काय गोड हा विनोद !

**कामंदकी**—मुली, बैस, तुला कांहीं सांगावयाचें आहे.

( सर्व बसतात. )

---

१ हर्ष. २ कामविचार. ३ शरीर. ४ कळ्यांनीं. ५ कमलांत. ६ मध.

**कामंदकी**—( मालतीची हनुवटी उचलून ) बेटा, तुला कांहीं चमत्कारिक गोष्ट सांगणार आहें, ती लक्ष्यपूर्वक ऐक.

**मालती**—सांगा, माझें लक्ष्य आहे.

**कामंदकी**—मागें एकदा प्रसंग निघाल्यावरून मी कुमार माधवाची गोष्ट तुजपाशीं बोललें होतें. मालती, बेटा, जशी तूं, तसाच माधवहि माझा केवळ प्राण आहे!

**लवंगिका**—हो, खरेंच, आपण एकदा तसें बोललां होतां खऱ्या!

**कामंदकी**—मदनोद्यानांतील यात्रेच्या दिवसापासून त्याचें चित्त मुळींच ठिकाणावर नाहींसें होऊन तो अगदीं झुरणीस लागला आहे. त्याला चैन म्हणून पडत नाहीं. त्याची शरीरप्रकृति फारच चमत्कारिक आणि विवश होऊन वापडा अगदीं पराधीन झाला आहे.

**इष्टामित्रांस, किंवा हिमकरें[1], कमलां पाहुनी होत नाहीं**
**त्याला आनंद; ताप प्रकट करि, जरी धीर आहे, तरीही;**
**ज्याची श्यामा असूनी तनु दिसत असे पाढरी कांहिं कांहीं,**
**झाली क्षीणा, तरी ती बहुत गमतसे रम्य नेत्रां सदाही. १**

**लवंगिका**—हो हो, मला आठवतें, परवां आपण आमच्या घरीं बोलत बसलां होतां, तेव्हां माधवाच्या जीवास समाधान नाहीं म्हणून त्याच्या समाचारास चलण्याविषयीं अवलोकिता आपणास त्वरा करित होती खरी. भगवति, त्याला काय बरें होतें?

**कामंदकी**—मीं असें ऐकिलें आहे कीं, ही मालती दृष्टीस पडल्यापासूनच माधवाची तशी कामी आणि खिन्न अवस्था झाली आहे. आणि मलाहि तसेंच वाटतें.

**पाहूनियां मालतिच्या मुखातें,**
**चांचल्य त्याच्या उपजे मनातें;**
**पूर्णेंदु येतां गगनीं पयोधी[2]**
**क्षोभे[3] जसा शांत असोनि आधीं. १**

**माधव**—( स्वगत ) अहाहा! भगवतीची उपक्रम करण्याची काय रीति ही? केवढा हा दुसऱ्याला मोठेपणा देण्याचा यत्न! अथवा,

---

१ चंद्र. २ समुद्र. ३ खवळे.

शास्त्रज्ञता, शिक्षितवाक्[1]विशुद्ध,
प्रौढत्व, आणी सहज[2] प्रबोध[3],
कालज्ञता, स्फूर्ति, अशा गुणांहीं
जो युक्त, त्या कांहिं अशक्य नाहीं! १

**कामंदकी**—बिचारा जिवास अगदीं त्रासला आहे! मरण लौकर यावें ह्मणून, विरहिजनास मरणप्रद अशा ज्या ज्या गोष्टी आहेत, त्यांचें तो बळें सेवन करितो. आतांशा तो—

कोकिलपक्षी ज्यांवरि बैसुनि सुस्वर शब्द करीती,
ऐशा पुष्पित आम्रतरूंवरि लावी दृष्टि सदा ती. १
बकुलवृक्ष बहु फुलले त्यांचा घेउन सुगंध भारी
वाहे वारा, तेथें बैसुनि रात्र घालवी सारी. २
बसे चांदण्यामधें जाउनी छत्रि करुनि कमलांची,
उपाय करि हे नानापरिंचे आस धरुनि मरणाची. ३

**माधव**—(स्वगत) अहाहा! आपल्याला मुळीं ठाऊकहि नाहीं, असा कांहीं चमत्कारिकच भगवतीच्या भाषणाचा प्रकार आहे हा!

**मालती**—( स्वगत ) खरेंच, तो हें फारच दुष्कर कर्म करित आहे!

**कामंदकी**—हा मुलगा आधींच स्वभावानें नाजूक, आणि कधींहि बिचाऱ्याला क्लेशांचें वारें ठाऊक नाहीं; त्याला आतां इतके क्लेश होत आहेत, ह्यामुळें मला त्याच्या जीवाविषयीं मोठा घोर लागून राहिला आहे!

**मालती**—( लवंगिकेस ) सखी, सर्व भूमंडळाला अलंकारच, अशा त्या महाभागाची अशी कठीण अवस्था भगवतीच्या मुखानें ऐकून माझ्या तर बाई तोंडचें पाणी पळालें! आतां पुढें काय करावें?

**माधव**—( स्वगत ) भगवती मजविषयीं इतकी काळजी वाहते, केवढा मी दैववान्!

**लवंगिका**—माई, आपण ह्मणतां त्याप्रमाणें असेल. परंतु आमच्या सखीची अवस्थाहि फार कठीण झाली आहे. ती महानुभाव आमच्या वाड्यावरून जाऊन राजमार्गास क्षणभर शोभवित असतां त्याला वारंवार पाहून ही आमची सखी झुरणीस लागली आहे. सूर्याच्या तीव्र किरणांनीं कोमल कमलाप्रमाणें हिचें

१ कमावलेली. २ अंगचा. ३ अक्कल.

अंग विरहसंतापानें कोमेजून गेलें आहे. ह्या मदनव्यथेनें ही विशेष रमणीय दिसते खरी, तथापि हिला दिवसेंदिवस वाळतांना पाहून आह्मा मैत्रिणींना मोठा घोर लागला आहे. हिला आतां खेळणें आवडत नाहीं, कोणाशीं बोलणें आवडत नाहीं, तळहातावर गाल टेकून ही एकांतीं चिंताक्रांत होऊन बसते, आणि ह्याप्रमाणें दिवसांचे दिवस घालविते. बागेंतील फुलांवरून सुगंध मंद वारा आला असतां त्यापासून सुख न वाटतां उलट हिला संताप होतो. आह्मी आमच्या प्रियसखी मालतीबरोबर मदनोद्यानांत गेलों होतों; तेथें माधवहि आला होता; त्याला पाहून आपल्या महोत्सवाचा चमत्कार पाहण्याकरितां साक्षात् कामदेवच प्रत्यक्ष रूप धारण करून आला आहे कीं काय, असेंच आह्मांला वाटलें! त्या प्रसंगीं आमच्या प्रियसखीची व त्याची नजरानजर झाली. त्यांचा तो प्रीतीचा डोळा, रोमांच व अंगकंप इत्यादि शृंगाराविर्भाव पाहून यथायोग्य जोडा जमला असें वाटून आह्मां सर्व सखीजनांस आनंद झाला. पण बाई, त्या दिवसापासून दुःख कमी व्हावें, तें उलटें अधिक होऊं लागलें. तेव्हांपासून हिच्या अंगाचा असह्य दाह होतो, आणि तेणेंकरून, उन्हानें कोवळ्या केळीसारखी ही सुकत चालली आहे. वारंवार प्रियकराचें ध्यान करित असल्यामुळें त्याची मूर्ति मनांत येऊन घटकाभर हिला मानसिक वल्लभसमागमाचा अनुभव झाला ह्मणजे आनंद होऊन हिच्या सर्वांगास दरदरून घाम सुटतो, तेणेंकरून उन्हानें तापलेल्या जमिनीवर अगोठीचा पाऊस पडला कीं काय त्याप्रमाणें ही गार व शांत होते. ही ध्यानांत निमग्न असतां हिचा अधरोष्ठ स्फुरण पावतो, गालांवर दाट रोमांच येतो, डोळ्यांत आनंदाश्रु येतात व फुललेल्या कमलांसारखे ते कांहीं उघडून त्यांची कांहीं अविद्यमान विषयाकडे तंद्री लागलीसें दिसतें. रुंद कपाळावर घामाचे बिंदु चमकतात. हीं सर्व चिन्हें पाहून जवळच्या चतुर व धूर्त सख्यांनां हिचें कौमारव्रत भग्न झालें कीं काय, अशी शंका उद्भवते. आणखी, ही चंद्रकिरणांच्या स्पर्शेकरून ज्याला पाझर सुटतात अशा चंद्रकांत मण्यांचे हार नेहमीं गळयांत घालून, कमळांच्या कोवळ्या पानांची शेज करून तिच्यावर निजून सखीजनांकरवीं कापराच्या व चंदनाच्या पाण्यानें भिजविलेल्या केळीच्या कोवळ्या पानांनीं वारा घेत ओल्या कमलपत्रांवर रात्रीच्या रात्री तळमळत पडते. तळमळतां तळमळतां चुकून एखादे वेळेस कदाचित् डोळा लागला असतां स्वप्न-सुखानुभवानें पुष्कळ घाम येऊन हिच्या पायांला लावलेला अळत्याचा रंग धुऊन

जातो, वस्त्रग्रंथि सैल होतात, श्वासोच्छ्वास जलद चालूं लागतो, अंगास कंप सुटतो, आपला प्रियकर जवळ आहे असें मानून त्याला ही भुजांनीं आलिंगन करूं लागते, आणि इतक्यांत जागी होऊन व तो नाहीं असें पाहून बावऱ्यासारखी इकडेतिकडे पाहूं लागते, व मूर्छेनें डोळे घट्ट मिटून अगदीं निश्चेष्ट पडते. हिच्या सखींनीं बहुत उपाय करून हिची मूर्छा घालविली असतां ही उसासे टाकिते, इतक्यावरून मात्र आह्मांला वाटतें कीं, ही अद्यापि जिवंत आहे. अशा अवस्थेंत पुढें काय करावें, कसें करावें, अशा चिंतेनें व्याप्त होऊन आह्मांला असें वाटतें कीं, हिची दशा पाहण्यापेक्षां आपल्याला मरण येईल तर बरें! हिचें दुःख आमच्यानें दूर होणें तर अशक्य आहे. आतां भगवतीच काय करील तें करो. मालती अशा वेदनेंत असतां, ह्याच प्रसंगीं चांदणी रात्र आली आहे; आणि वसंतऋतूचेहि दिवस आले आहेत. इकडे हा मलयपर्वतावरचा सुगंध वायु सुटला आहे. पुष्पांच्या परिमळानें दाही दिशा भरल्या आहेत. हा प्रसंग तर मोठा कठीण गुदरला आहे. आतां प्रियसखीचें पुढें कसें होईल कोण जाणे!

**कामंदकी**—लवंगिके,

**प्रेम हिचें जरि त्यावरि आहे, हें फल गुणज्ञतेचें,**
**ह्या चातुर्या पाहुनि वत्से! सुख मज झालें साचें.** १
**तथापि तुझिया सखिची ऐशी कठिण दशा पाहोनी,**
**फुटुनचि काळिज माझें गेलें, चिंताशर लागोनी.** २

**माधव**—( स्वगत ) भगवतीच्या हृदयास आनंद होतो, हें योग्यच आहे.

**कामंदकी**—अरेरे! मोठा कठीण प्रसंग आला! कसा पार पडेल नकळे!

**मुलिचें आहे शरीर सुंदर, अणि जात्या सुकुमार,**
**विदित समस्तांप्रति तापप्रद आणि भयंकर मार[१].** १
**मलयाद्रीचा पवन सुटे हा सुगंध वारंवार,**
**आला कालहि शुक्लपक्षिचा कैसा हो अनिवार!** २

**लवंगिका**—भगवतीला हें कळलें असेलच! ( मालतीनें वस्त्राखालीं लपवून ठेवलेली चित्राची पाटी दाखवून ) ही माधवाची तसबीर, आणि ( मालतीचा पदर एकीकडे करून तिच्या गळ्यांत असलेली माळ दाखवून ) ही मालतीच्या गळ्यांतील बकुळीच्या फुलांची माळा! ही माळा काय ती प्रियसखीला प्राणधारण

१ मदन.

करण्याला आधारभूत झाली आहे! कारण, ही माधवानें स्वहस्तानें गुंफिली आहे.

**माधव**—(स्वगत)

**धन्य अससि तूं बकुलमालिके! सखये! सर्व जगांत,**
**मृगनयनेची होउनि अवडति, तीच्या वससि गळ्यांत. १**
**कमलतंतुच्या परी, शुभ्र जे विरहानें स्तन झाले**
**त्यांवरि शोभसि, सौधावरि[1] जशि पताक सुंदर हाले! २**

(इतक्यांत जवळच गलबला होतो.)

अहो शिवालयांतील लोकहो! धांवा हो, लवकर धांवा! वयांत आल्यामुळें पिसाळलेला वाघ, लोखंडी सांपळा मोडून आणि सांखळदंड तोडून बाहेर सुटला आहे. अहो, पहा, पहा! हा आपलें लांब शेंपूट विजयध्वजासारखें वर उचलून कसें गर्वानें हालवित आहे, व तडातड भुईवर आपटित आहे! बाहेर पडतांच, भुकेच्या पहिल्या सपाट्यांत त्यानें कितीएक माणसें तोंडांत टाकून दाढेनें त्यांचीं हाडें कडकडां चावून गिळून टाकलीं; तसेंच पंज्याच्या तडाख्यानें कितीएक घोडे मारले, व कितीएक मनुष्यें घायाळ केलीं. त्यानें किंकाळी फोडली ह्मणजे, पहा, कसा मेघांच्या गडगडाटासारखा शब्द होत आहे व तो ऐकून सर्व लोक भयाभित होऊन वाट फुटेल तिकडे सैरावैरा पळत सुटले आहेत. वाघानें मारलेल्या माणसांच्या व जनावरांच्या अंगांतलें पुष्कळ रक्त वाहून तो जिकडे जिकडे गेला तिकडे तिकडे रक्ताचा चिखल झाला आहे! अरे, अझूनहि स्वस्थ कसे बसलां? धांवा, लवकर धांवा! ह्या दुष्ट वाघानें मोठा आकांत मांडला आहे! ह्याच्या झपाट्यांत आमची प्रियसखी मदयंतिका सांपडली आहे! लवकर येऊन तिचें संरक्षण करा, हो संरक्षण करा!

(इतक्यांत बुद्धरक्षिता येते.)

**बुद्धरक्षिता**—(भयानें) अहो संरक्षण करा, हो संरक्षण करा! हा मेला पिसाळलेला वाघ कितीएक लोकांस मारून, कितीएक लोकांस पळवून नंदनाची वहीण मदयंतिका, हिचा जीव घेऊं पहात आहे!

**मालती**—अग लवंगिके, हाय, हाय! मोठा घात झाला!

**माधव**—(गडबडीनें उठून) बुद्धरक्षिते, कोठें आहे तो वाघ?

---

१ गच्ची.

**मालती**—( पाहून हर्षानें आणि भयानें स्वगत ) काय ? माझा प्रियकरहि येथेंच आहे ?

**माधव**—( स्वगत ) अहाहा ! केवढा मी पुण्यवान् ! मी अकल्पित दृष्टीस पडल्यानें आनंदानें विकसित व लज्जेनें संकुचित अशा नयनांनीं मजकडे पाहून, प्रियेनें—

**माळेनें कमळांचिया मज तिनें कीं वाटतें बांधिलें,**
**किंवा स्नान दुधेंकरून मजला कीं वाटतें घातिलें;**
**कीं नेत्रें उघडोनि आंत भरिलें मातें, सुधावृष्टिनें**
**सर्वांगांप्रति सिंचिलें बहु, तसें पद्मोल्लसत्दृष्टिनें[१]. १**

**बुद्धरक्षिता**—हे महाभागा, तो मेला क्रूर वाघ बागेच्या बाहेर रस्त्याच्या तोंडावरच आहे !

( माधव वेगानें व आवेशानें इकडे तिकडे फिरतो. )

**कामंदकी**—वत्सा, सावधपणानें पराक्रम कर, बरें !

**मालती**—( लवंगिकेस ) सखी, मोठें अरिष्ट आलें !

( साऱ्या त्वरेनें इकडे तिकडे फिरतात. )

**माधव**—( पुढें पाहून चिळस आल्यासारखें करून )

**रक्ताचा पूर वाहे, पसरलिं हडकें, आंतडीं लोंबतात,**
**मांसाचा ढीग झाला, पडलिं बहुत हीं मुंडकीं, खात खात**
**घारी फेरे वरोनी घडि घडि करिती, टोंचिती काक यातें,**
**व्याघ्रानें कृत्य केलें यमसम, करुणा कोठुनी येत त्यातें ? १**

हाय हाय ! मोठा घात झाला.

**ही हातीं सांपडली व्याघ्राच्या, तैं अह्मी असों दूर**

**साऱ्याजणी**—हाय हाय ! मदयंतिके !

**कामंदकी**— } ( आनंदानें )
**माधव**— }

**व्याघ्रानें जो वधिला, तत्करिंचें शस्त्र घेउनी, शूर. १**
**मकरंद तेथ येउनि अवचित, सत्वर मधें उभा ठेला,**

**दुसऱ्या**—शाबास ! महाभाग्यवंता, शाबास !

---

१ कमलासारखी टवटवीत जिची दृष्टि, अशा मालतीनें.

**कामंदकी—**
**माधव—** } **पडला व्याघ्र तयावरि,**

**साऱ्या**—हाय हाय!

**कामंदकी—**
**माधव—** } (हर्षानें)—**परि मकरंदाहतेंचि तो मेला. २**

**दुसऱ्या**—(आनंदानें) बरें झालें, अरिष्ट टळलें!

**कामंदकी**—अरेरे, माझ्या वत्सा मकरंदास वाघानें बळकट पंजा मारिला! पहा, ह्याच्या अंगांतून रक्ताचा प्रवाह चालला आहे तो! हा भुईवर तरवार टेकून तीवर भार सांवरून स्तब्ध उभा राहिला आहे. त्याला चक्कर आली आहेसें वाटतें. मदयंतिकेनें घाबरून त्याला सांवरून धरलें आहे.

**दुसऱ्या**—हाय हाय! ह्याला वाघाचा पंजा वर्मी लागला वाटतें!

**माधव**—अरेरे, माझा प्राणसखा मूर्च्छित पडला. भगवति, मला ह्या संकटांतून सोडीव.

**कामंदकी**—वत्सा, तूं मनाचा फार कोंवळा आहेस. मकरंदास कितपत जखम लागली आहे, तें स्वतः जाऊन पाहूं.

[ सर्व जातात.

**[ शार्दूलविद्रावणनामा तृतीय अंक समाप्त. ]**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—कुसुमाकर उद्यान. मदयंतिका आणि लवंगिका ह्यांनीं सांवरून धरलेले असे माधव आणि मकरंद मूर्छितावस्थेंत आहेत, तशाच कामंदकी, मालती आणि बुद्धरक्षिता ह्या अगदीं घाबरून गेल्या आहेत, असा प्रवेश. ]

**मदयंतिका**—भगवति, माझा जीव बचावण्यासाठीं, दीनांचा दयाळू अशा ह्या महाभागानें आपला जीव धोक्यांत घातला. हा लौकर सावध होईल असा कांहींतरी उपाय करा हो !

**दुसऱ्या**—हाय हाय ! आतां आह्मीं काय करावें ?

**कामंदकी**— } ( माधव आणि मकरंद ह्या दोघांवर कमंडलूंतील पाणी
**बुद्धरक्षिता**— } शिंपडून ) तुह्मी ह्यांनां आपल्या पदरांनीं वारा घाला.

( मालती आदिकरून सर्वजणी आपापल्या पदरांनीं वारा घालितात. )

**मकरंद**—(सावध होऊन पाहून) गड्या माधवा, इतका भ्यालास कां ? मला कांहीं झालें नाहीं, मी खुशाल आहें !

**मदयंतिका**—( हर्षानें स्वगत ) मकरंद पूर्णचन्द्र उदयास आला !

**मालती**—( माधवाच्या कपाळावर हात ठेवून ) सखी लवंगिके, आनंदाची गोष्ट झाली ! महाभाग मकरंद सावध होतांच तुझा प्रियसखाहि सावध झाला.

**माधव**—(सावध होऊन) मित्रा साहशा ! ये ये, अगोदर मला कडकडून भेट पाहूं. ( त्याला आलिंगितो. )

**कामंदकी**—( दोघांचें मस्तक हुंगून ) ईश्वरानें मोठीच खैर केली ! माझीं बाळें मला पुनः दिलीं !

**दुसऱ्या**—( हर्षित होऊन ) फार चांगलें झालें !

**बुद्धरक्षिता**—( एकीकडे ) सखी मदयंतिके, हाच तो मकरंद बरें !

**मदयंतिका**—हो, मीं तें तेव्हांच ताडलें, हा माधव आणि हेच माझे प्रियकर ह्मणून !

**बुद्धरक्षिता**—सखे, मीं वर्णन केलें तसा आहे कीं नाहीं ? मी खरें बोललें ना ?

**मदयंतिका**—खरें ह्मणून काय विचारतेस? तुझ्यासारख्या जिवलग सख्या, भलत्याचेंच इतकें वर्णन करितील काय! (माधवाकडे पाहून) सखी, मालतीची प्रीति ह्या महाभागावर जडली आहे, असा लोकांत पुष्कळ बोलवा आहे, आणि तिची प्रीति योग्य ठिकाणीं बसली आहे, ह्यांत संशय नाहीं. (पुनः मकरंदाकडे उत्कंठापूर्वक पाहते.)

**कामंदकी**—(स्वगत) आज मदयंतिका आणि मकरंद ह्या दोघांची परस्पर दृष्टादृष्ट झाली, हें फार चांगलें झालें. (उघड) वत्सा मकरंदा, आज मदयंतिकेचा प्राण वांचविण्यासाठीं तुला दैवानें याच वेळीं नेमका कसा पाठविला, याचें मला मोठें नवल वाटतें!

**मकरंद**—मीं आज नगरांत कांहीं चमत्कारिक वार्ता ऐकली. तीवरून मला वाटलें कीं, माधवाच्या चित्ताला आज अधिक उद्वेग झाला असेल. इतक्यांत अवलोकितेनें कुसुमाकर बागेंतील वृत्तांत सांगितला. त्यावरून तसाच तडक इकडेच येत होतों, तोंच मार्गांत ही कुलीन कन्या वाघाच्या झपाट्यांत सांपडलेली दृष्टीस पडली.

**कामंदकी**—(स्वगत) ती वार्त्ता बहुधा मालतीच्या वाग्दानासंबंधींच असावी! (उघड) वत्सा माधवा, तुझा प्रिय मित्र आज तुला लाभला, ही मोठ्या आनंदाची गोष्ट समजली पाहिजे! ह्या असल्या आनंदाच्या प्रसंगीं तूं मालतीला कांहींतरी प्रीतीचें बक्षिस दिलें पाहिजे!

**माधव**—भगवति,

> **क्रूरव्याघ्रें मन्मित्राला पीडा बहुत केली,**
> **तेणें झाली व्यथा मला, ती हीनें विलया नेली १**
> **स्वकरस्पर्शें; मजवरि मोठा हिचा असे उपकार,**
> **मन आणी जीवित अर्पियलें, करु त्यांचा स्वीकार. २**

**मदयंतिका**—(स्वगत) समयोचित भाषण करण्यांत हा महाभाग मोठा कुशल दिसतो!

**लवंगिका**—माझ्या प्रिय सखीच्या वतीनें मी आपल्याला कळवितें कीं, आपण तिला दिलेलें हें बक्षीस तिनें मोठ्या आनंदानें स्वीकारिलें आहे.

**मालती**—(स्वगत) मकरंदानें उद्वेगाचें कारण ह्मणून ह्मटलें, तें काय असावें बरें?

**माधव**—गड्या, मला उद्वेग होण्याची वार्ता तूं ऐकिली, ती कोणतीरे ?

( इतक्यांत एक दूत येतो. )

**दूत**—वत्से मदयंतिके, तुझा ज्येष्ठ बंधु अमात्य नंदन, ह्यानें सांगितलें आहे कीं, 'आज महाराज आपल्या घरीं आले होते, व त्यांनीं भूरिवसूवर आपला मोठा विश्वास आणि आमच्यावर अनुग्रह असल्याचें व्यक्त करून मालती आह्मांला दिली. याकरितां आनंदमहोत्सवाच्या तयारीस लागूं या.' तर चल लौकर.

**मकरंद**—गड्या, ती ही वार्ता बरें !

( मालती आणि माधव हिरमुसल्यासारखीं होतात. )

**मदयंतिका**—( हर्षानें मालतीला आलिंगून ) सखी मालती, आपणा दोघींचा जन्म ह्याच नगरांत झाला, आणि बालपणापासून आपण एकत्र खेळत आलों. ह्यामुळें पूर्वीपासून तूं माझी जिवलग मैत्रीण तर होतीसच; आज तर आमची मालकीण-आमची गृहलक्ष्मी झालीस !

**कामंदकी**—वत्से मदयंतिके, तुझ्या भावाला मालती मिळाली, ह्यावरून आजचा दिवस मोठा आनंदाचा आहे !

**मदयंतिका**—भगवति, आपल्या आशीर्वादाचेंच हें फल ह्मटलें पाहिजे. लवंगिके, तुझ्या स्नेहाच्या लाभानें आज आमचे मनोरथ सफळ झाले.

**लवंगिका**—सखी, हें बोलून का दाखविलें पाहिजे ?

**मदयंतिका**—बुद्धरक्षिते, चल ये, आपण विवाहोत्सवाच्या तयारीस लागूं.

**बुद्धरक्षिता**—सखी चल जाऊं. ( उठतात. )

**लवंगिका**—( एकीकडे वळून ) भगवति, मदयंतिका आणि मकरंद ह्यांचें मन चंचळ झालेंसें दिसतें. पाहिलें का, हीं दोघें उत्कंठेनें परस्परांकडे कशीं डोळे मोडून पाहत आहेत तीं ? ह्यावरून मला वाटतें, दोघांचें मन मिळालें आहे.

**कामंदकी**—( हंसून ) हीं दोघें परस्परांकडे पाहून मानसिक सुखाचा वारंवार अनुभव घेत आहेत.

**दृष्टि वांकुडी करूनि किंचित्, उचलुनि भुंवया कांहीं,**
**झांकुनि नेत्रप्रांत, परस्पर दोघें निरखिति, पाहीं. १**
**मेषोन्मेषा[1] विसरति, तंद्री[2] लागुनि प्रेमरसाची,**
**जणुं दृङ्मार्गें[3] बाहिर येउनि मनें भेटती त्यांचीं. २**

---

१ डोळ्याचें पातें लावणें व उघडणें. २ एकाग्रवृत्ति. ३ डोळ्यांवाटे.

**तटस्थ वृत्ती झाल्या साऱ्या, दुसरें न सुचे कांहीं,**
**अतां प्रीतिची परस्परांच्या शंका उरली नाहीं !** ३

—चलावें ताईसाहेब.

**यंतिका**—सखी बुद्धरक्षिते, तो कमलनेत्र, प्राणदाता, पुनः दृष्टीस पडेल ?

**रक्षिता**—दैव अनुकूल झाल्यास त्यांत काय कठीण आहे ?

[ दूतासह दोघी जातात.

**व**—( एकीकडे वळून )

**तंतु आशेचा आज तुटुनि गेला,**
**बहुत वर्षें जो मनीं वागवीला;**
**अतां विरहव्याधि या शरीरातें**
**करिल पसरूनी निरवधि व्यथेतें.** १
**बरें, माझा सर्वथा घात ऐसा**
**करुनि पावो तें दैव तरी हर्षा !**
**माधवातें गांजुनी व्यर्थ फार,**
**धन्य मानो आपणा मदनवीर.** २

या,

**तिची मजला लाधली प्रीत पूर्ण,**
**परी दुर्लभ ती असे पराधीन;**
**तिच्या प्राप्तीची मनीं आस केली,**
**योग्य शिक्षा ही मज प्राप्त झाली.** १
**परी तातें आपणा अर्पियेलें**
**वरा अन्या वृत्त हें परिसयेलें**
**जंई तीनें, तेधवां वदन तीचें**
**होइ एकाकीं म्लान फार साचें !** २
**प्रभातींचा चंद्रसें फटफटीत,**
**जैवि पोळे कीं कमल अकस्मात,**
**दुःख तीचें तें स्मरुनि हृदय फाटे,**
**जणों अंगा लागली आग वाटे !** ३

**कामंदकी**—( स्वगत ) वत्स माधव! तूं असा अत्यंत दुःखित झालेला पाहून मला फार खेद होतो! तसेंच मालतीहि आशाभंग झाला असतां फार दिवस वांचावयाची कठीण आहे! ( उघड ) बा माधवा! भूरिवसूच आपण होऊन तुला मालती देईल, असें तुला वाटत होतें कीं काय?

**माधव**—( लाजून ) नाहीं नाहीं, तो तसें करील अशी आशा मीं कधींच केली नाहीं!

**कामंदकी**—तर मग पहिल्यापेक्षां विशेष निराशा वाटण्यासारखें सध्या काय झालें आहे?

**मकरंद**—भगवति, मालतीचें वाग्दान होऊन गेलें ह्मणून माधवास विशेष भय वाटतें.

**कामंदकी**—अरे, ही वार्ता तर मला आधींच समजली आहे. राजानें नंदनासाठीं भूरिवसूपाशीं मालतीची मागणी केली, तेव्हां 'आपल्या कन्येचा विचार आपण पाहिजे तसा करावा' असें भूरिवसूनें राजाला सांगितलें, ही गोष्ट सर्व लोकांत प्रसिद्ध झाली आहे.

**मकरंद**—हो, हो, अशी ऐकिली आहे खरी.

**कामंदकी**—राजानेंच स्वतः नंदनाला मालती दिली, असें आतांच दूतानें येऊन सांगितलें; पण तें व्यर्थ आहे. कारण, मनुष्यास जें कर्तव्य असतें, तें केवळ त्याच्या अंतःकरणांत असतें, बोलण्यावर काय आहे? बोलण्याचा अर्थ पाहिजे तसा करितां येतो! भूरिवसु राजास जें कांहीं बोलला, त्याचा अर्थ निराळाच आहे! 'आपल्या कन्येचा विचार आपण पाहिजे तसा करावा' ह्या भूरिवसूच्या वाक्याचा अर्थ तुमची कन्या नंदनास देण्यास तुह्मी समर्थ आहां, असाहि होतो. ह्यावरून पहा, मालती राजाची कन्या नव्हे, आणि लोकांच्या कन्येचें दान राजानें करावें असें धर्मशास्त्रहि नाहीं, व लोकांत तशी चालहि नाहीं! तर आतां ह्या सर्व गोष्टी मनांत आणा. वत्सा माधवा, मी गैरसावध आहें, असें तुला वाटतें काय? पहा—

**होतें दुःख मनीं तुझ्या बहुत जें, जें मालतीच्या मनीं,**
**तें होवो न तुझ्या रिपूसहि! महायत्नास आलंबुनी**
**सर्वस्वें झटतें समग्र तुमचा इष्टार्थ साधावया;**
**मीं केला पण,–हें न होय तरि,–ह्या प्राणांस कीं द्यावया. १**

**मकरंद**—भगवति, आपण बोललां हें योग्यच आहे. आणखी,

**आहे चित्त तुझें विरक्त, तरि तूं बाळांशि या माउली!**
**स्नेहातें अथवा दयेसि करुनी होशी कृपासाउली;**
**त्यायोगें यतिच्या[1] व्रतास उलट्या यत्नासही लागशी,**
**जाणे कोण पुढें विधी घडवितो सिद्धी कशी कायशी? १**

(इतक्यांत बाहेर शब्द होतो.) भगवति कामंदकी, राणीसाहेब विनंति करितात कीं, आपण मालतीला घेऊन त्वरित यावें.

**कामंदकी**—वत्से, ऊठ. (सर्व उठतात.)

(मालती आणि माधव दीनपणें आणि प्रीतीनें परस्परांकडे पाहतात.)

**माधव**—(स्वगत) ह्या संसारामध्यें माधवास मालतीशीं सहवास काय तो हा इतकाच! अहो, कायहो हें?

**मित्राप्रमाणें अनुकूल वागुनी**
**पूर्वीं झटे जें हितमात्र साधनीं;**
**एकाकिं तें दैवचि शत्रु होउनी**
**गांजी मनुष्या अति दुःख देउनी. १**

**मालती**—(स्वगत) हे महाभाग्यवंता! हे नेत्रानंददायका! तुझी माझी आतां हीच भेट!

**लवंगिका**—हाय हाय! अमात्यानें आमच्या प्रियसखीचा कसा हा घात केला!

**मालती**—(स्वगत) आतां माझी वांचण्याची इच्छा संपली! ताताच्या निर्दयपणाची पराकाष्ठा झाली! ह्या मेल्या दैवानें जें कृत्य आरंभिलें, तें शेवटास नेलें. मीच फुटक्या दैवाची, तेव्हां दुसऱ्याला काय बोल लावावयाचा आहे! ह्या प्रसंगीं अनाथ मी कोणाला शरण जाऊं?

**लवंगिका**—सखी, इकडे ये, इकडे ये.

[ जातात.

**माधव**—(स्वगत) भगवतीचा मजवर अत्यंत लोभ आहे, ह्मणून हें माझें तिनें उगीच समाधान मात्र केलें आहे! (उद्वेगानें) हर हर! सर्व प्रकारें माझा जन्म व्यर्थ झाला! आतां पुढें काय करावें? (चिंतन करून) आतां महामांस-

---

१ वैराग्यास.

कयाशिवाय मला दुसरा उपाय दिसत नाहीं! (उघड) गड्या मकरंदा, तुला दयंतिकेची उत्कंठा लागली आहे वाटतें?

मकरंद—हें काय विचारतोस? माझें मन तिजकडे गढून गेलें आहे.

**व्याघ्राच्या नखरीं प्रहार मजला झाले असें पाहुनी,**
**डोळे चंचळ पाडसापरि जिचे, ती घाबरी होउनी**
**आंगींचा पडला जरी पदर तो त्यातें न जी सांवरी,**
**प्रेमालिंगन देउनी बुडवि कीं मातें सुधासागरीं. १**

माधव—तुझें मन जर तिजकडे लागलें आहे, तर तुझी प्रियसखी बुद्धरक्षिता जवळच आहे.

**व्याघ्रा मारुनि मृत्यूपासुनि जेणें रक्षण केलें,**
**आलिंगनसुख ज्यापासुनिही प्राप्त तयेला झालें; १**
**त्या तुज सोडुनि दुसऱ्यावरि, ती रमेल कैशी आतां?**
**तिनें दर्शनें व्यक्तचि केलें प्रेम तुजवरि जातां. २**

मकरंद—तर मग ऊठ, ह्या संगमावर स्नान करून नगरींत जाऊं.

(दोघे उठून इकडे तिकडे फिरतात.)

माधव—हा येथें महानद्यांचा संगम आहे.

**हेमाच्या कलशासमान कुच जे उत्तुंग[1] त्यांच्यावरी**
**हस्तस्वस्तिक[2] त्या करूनि बसल्या त्यांच्या[3] तटाकावरी;**
**वस्त्रेंही भिजलीं ह्मणून दिसतें सर्वांग ज्यांचें पहा,**
**त्यांहीं संगम हा सुरम्य दिसतो आहे मनस्ताप हा. १**

[ चवथा अंक समाप्त. ]

---

१ उच्च. २ डावा हात उजव्या खांद्यावर व उजवा हात डाव्या खांद्यावर ठेविला, ह्मणजे हस्तस्वस्तिक होतें. ३ नद्यांच्या.

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

( विष्कंभक. )

[ **स्थळ**—कराला देवीच्या मंदिराजवळील महास्मशान. भीषण वेष धारण करून आकाशमार्गानें कपालकुंडला येते, असा प्रवेश. ]

कपालकुंडला—

**सर्वांच्या जो हृदयीं षोडशनाडीचक्रामध्यें**
**राहे, त्याला जाणति जे, त्यां सिद्धी सत्वर लाधे. १**
**करुनि स्थिर मन साधक जन ज्या शोधिति शक्तीनाथा,**
**सर्वोत्कर्षें राहे, तो दे भजकाला पुरुषार्था. २**

ही मी आतां—

**सहा ऊर्मींच्या[1] चक्रांत, राहे तैसा असे शाश्वत,**
**उगवे जो हृदयाब्जांत, शिवरूपी अंतरात्मा. १**
**पाहतें तया लय लावोनी, मेघमंडळातें दुभागुनी,**
**नाडींचा उदयक्रम धरोनी शरीराचीं पंच भूतें. २**
**आकर्षिलीं मीं याकारणें, गमनश्रम न होई मजकारणें,**
**दुर्धर योगाच्या धारणें, कांहीं मज नसे असाध्य. ३**

**हृदयीं कपालमाला वाजति लागूनि एकमेकींस,**
**तैशीच मेखलेचीं करिती घुंघरेंहि घणघणा घोष. १**
**वेगें प्रयाण करितां गगनपथें यापरी चमत्कार**
**होती, जे पाहुनियां भीरु जनां भीति वाटते फार. २**

ते असे कीं—

**ग्रंथीनें बांधिलाही असुनि उडतसे हा जटाभार थोर,**
**संस्कारें दीर्घ दीर्घ ध्वनिहि डमरुच्या किंकिणींचा गभीर,**
**घंटानादास हेतू, शवमुखविवरीं गुंगुनी ऊर्ध्व वाहे**
**वायू माझी पताका सतत फडफडा वीततो फार आहे. १**

---

१ हीं ऊर्मिचक्रें योगशास्त्रांत प्रसिद्ध आहेत.

( फिरून पाहून गंध हुंगून ) या चितेच्या धुराच्या वासावरून येथें स्मशान आहेसें वाटतें. ह्याच स्मशानाच्या सन्निध कराला देवीचें स्थान आहे. बरें, आमचे गुरु अघोरघंट ह्यांची मंत्रसिद्धि होण्याच्या वेतांत आली असावी, आणि गुरूजींनीं तर मला आज्ञा केली आहे कीं, 'वत्से कपालकुंडले! पूर्वी आपण नवस केल्याप्रमाणें कराला देवीला आज एक स्त्रीरत्नाचा बळी द्यावयाचा आहे, यासाठीं ती स्त्री आणि पूजेचें सर्व साहित्य घेऊन ये.' आणि तें स्त्रीरत्न ह्याच नगरांत आहे. तर तिला आतां इकडे आणलें पाहिजे. (विस्मयानें पुढें पाहून) अत्यंत गंभीर आणि सौम्याकृति असा हा हातांत तरवार घेऊन स्मशानांत कोण येत आहे बरें ?

**याचें अंग सुनील पद्मसमही झालें असे धूसरें[१],**
**ज्याची रम्य गती, असा शशिमुख, श्रेष्ठांत अग्रेसरें[२];**
**याचा वामभुज प्रशस्त सुचवी हा साहसातें कसा,**
**घेवोनी नरमांस फार भरला रक्तें करोनी तसा. १**

( बारकाईनें पाहून ) हं, हं, समजलें. कामंदकीच्या मित्राचा पुत्र, महामांसाचा विक्रय करणारा हा माधवच होय! पण आपल्याला ह्याच्याशीं काय करावयाचें आहे? आपण आपल्या कामाला लागावें. सूर्यास्त होऊन रात्र पडत चालली आहे. ह्या काळीं काय चमत्कार दिसतो पहा !

**आकाशास तमालगुच्छसदृश व्यापी तमःसंघ[३] हा,**
**पृथ्वी ही दिसते जणों नवजलामध्यें बुडाली, पहा !**
**प्रारंभींच वनामधें करितसे काळोख भारी निशा[४],**
**वाटे, धूरचि वायुनें पसरुनी व्यापूनि गेल्या दिशा. १**

[ जाते.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—महास्मशान. बीभत्स वेषानें माधव प्रवेश करितो. ]

**माधव**—( उत्कंठापूर्वक )

**स्नेहें प्रकट करुनियां आशय मुग्धदृष्टिनें केल्या**
**त्या त्या चेष्टा दिसतिल मज का? प्रेमरसें ज्या भिजल्या! १**

---

१ मळलेलें. २ अग्रगण्य. ३ समुदाय. ४ रात्र.

**ज्या मनिं येतां केवळ, सर्वहि लोपति इंद्रियवृत्ती!**
**अमृतसमुद्रीं मन पोहतसे होउनि दुःखनिवृत्ती. २**

आणखी,

**बकुलसरानें[1] सुगंध तुंग स्तनतट[2] लावुनि अंगा,**
**प्रेमभरानें पाहुनि, करुनी क्षणोक्षणीं भ्रूभंगा[3]; १**
**गालाशीं पैं गाल भिडवुनी आलिंगन मजला तें!**
**प्राणवल्लभा देइल, कीं मज करिल भाग्य साह्यातें? २**

आणखी,

**ज्याचें दर्शन झालिया, जणुं, सुखें संपूर्ण एकत्र तीं**
**होती, कीं नयनांस उत्सव घडे होई मनाला रती;**
**जें बालेंदुकलारसेंच घडलें वाटे! असें तें मुख**
**माझ्या दृष्टि पडोनि होइल पुनः चित्तास केव्हां सुख? १**

आणि वास्तविक ह्मटलें, तर आतां ती दृष्टीला पडून तरी काय विशेष होणार आहे? तिला पूर्वीं पाहिल्यापासून अंतःकरणास जो दृढ संस्कार झाला आहे, तो सतत जागृत आहे. दुसरे कोणतेहि व कितीहि विषय मनांत आले, तरी त्याला खंड ह्मणून पडत नाहीं. प्रियेचें ध्यान अखंड चाललें आहे, त्यामुळें माझें अंतःकरण अगदीं तन्मय होऊन गेलें आहे. कारण—

**मच्चित्तीं ती मिळोनि गेली, प्रतिबिंबित कीं झाली,**
**किंवा लिहिली, खोदियली, कीं खचोनियां बसवीली; १**
**वज्रलेपनें चिकटलि, अथवा पांचा बाणीं खिळिली**
**कामें; वाटे, चिंतातंतूजालीं ही गुतवीली. २**

( जवळच गलबला होतो तो ऐकून ) अहो, आतां जिकडे तिकडे हीं भुतें उठल्यामुळें हें स्मशान मोठें भयंकर दिसत आहे! पहा येथें काय चमत्कार होत आहे तो!

**पडला येथें अंधकार, जेणें व्यापिलें दिगंतर,**
**खचूनि गेलें कीं हें अंबर, कांहीं येथें दिसेना. १**
**ह्या अंधकारीं चिताज्वाला, लखलखती अत्यंत चंचला,**
**आरडोनि पिटिती टाळ्या, क्रीडा करिती पिशाचें. २**

१ माळेनें. २ स्तनप्रदेश. ३ भुंवयांची वक्रता.

असो. आतां मोठ्यानें आरोळी ठोकून सर्वांस कळवितों. अहो, अहो, स्मशानवासी पिशाच हो !

**शस्त्रस्पर्श न ज्यातें, पुरुषांगांतून काढिलें आहे,**
**विकितों मी मांस खरें, प्रेतांनों ! या पुढें, पहा, घ्या हें ! १**

(पुन: आणखी गलबला होतो तो ऐकून) कायहो येथें हा चमत्कार तरी! माझ्या आरोळीबरोबर येथें चोहोंकडून भुतें एकदम उठून टाळ्या वाजवित व आरोळ्या मारित सुटलीं. ह्यांच्या गडबडीनें हें स्मशान जिकडे तिकडे हलकल्लून गेलें आहे!

**उल्कामुखांचीं येथें भुतें, भयासूर असती अगणितें,**
**पसरोनियां वक्रदरींतें, इकडे तिकडे धांवती. १**
**ह्यांच्या दाढा अति विक्राळा, जिव्हा हलविती जींलळलळा,**
**ज्यांच्या मुखांतोनि निघती ज्वाळा, पाहतां वीरांही भय वाटे. २**
**केव्हां दिसती, केव्हां न दिसती, कितीक अत्यंत शुष्क असती,**
**केश आणि नेत्रपंक्ती, आरक्त यांच्या विजेपरी. ३**

आणखी,

**ह्या पूतना हें नरमांस भक्षिती,**
**खाऊनि अर्धें विखरोनि टाकिती;**
**धरोनियां पंगत लांडगे इथें,**
**श्वानेंहि तैशीं बसलीं जिथें तिथें. १**

( चोहोंकडे पाहून ) कायहो ही पिशाचांची रीत ?

**कशीं ह्यांचीं निस्तेज शरीरें, कृश, उंच आणि भयंकरें,**
**पसरोनियां मुखविवरें, जिभा लांब काढिती. १**
**वणवा लागोनी करपती, जुनाट वृक्ष गगनगती,**
**ढोल्यांतून व्याल लोंबती, तयांपरी दिसती हीं. २**

( इकडे तिकडे फिरून ) अरेरे ! पुढें तर फारच घाण आहे !

**फाडफाडोनी कातडें, उपसोनियां सारीं हाडें,**
**ओढोनियां आंतडें, पिशाच मांस भक्षिती. १**

अहो, ह्या पिशाचस्त्रिया कायहो रंगांत आल्या आहेत !

**हृत्कमलांच्या घालोनि माळा, रक्त कुंकुम लाविती भाळा,**
**आंतड्यांचीं करोनी गळां, मंगळसूत्रें घालिती. १**

**करोनि ऐशी शृंगाररचना, आनंदें करिती पिशाचांगना**
**पतीसवें मदमद्यपाना, करूनि प्याले करट्यांचे. २**

( इकडे तिकडे फिरून 'शस्त्रस्पर्श न ज्यातें' ही पूर्वोक्त आर्या पुन्हा ह्मणून ) अहो, ह्या भुतांच्या चेष्टा मात्र भयंकर आहेत, परंतु ह्यांनां धैर्य व बल अगदींच नाहीं! पहा, मला पहातांच हीं सर्व भिऊन पळून गेलीं. (फिरून पाहून खेदानें) हें स्मशान सर्व शोधून पाहिलें. ही स्मशानापलीकडे नदी आहे—

**तीरांवरी लतांच्या जाळ्या, तेथें लांडगे देती आरोळ्या,**
**त्यासवें घुबडांच्या टोळ्या, गर्जना करिती विक्राळ. १**
**मध्यें पडले थोर थोर, हाडां कवट्यांचे हे डोंगर,**
**तयांस अडखळोनियां फार वेग येत प्रवाहातें. २**
**खळखळां चालली जिची धार, ऐशी ही अत्यंत भयंकर,**
**स्मशानापलीकडे थोर विस्तीर्ण नदी वाहतसे. ३**

( दुसरीकडे शब्द होतो. ) हा ताता! निर्दया! तूं जिच्या योगानें राजाची मर्जी मिळवूं इच्छित होतास, त्या तुझ्या दीन कन्येची काय पहा ही दशा होत आहे!

**माधव**—( कान देऊन )

**जैशी पीडा पावुनि विव्हळ हरिणी बहुत ओरडती,**
**परिचितसा मज वाटे शब्द जिचा गोड, कोण ही रडती? १**
**हृदय फुटे परिसुनि हा शोक, तसा स्तंभ होतसे देहा,**
**गमनीं लागति ठेंचा, प्रसंग भीतीस कां अशा दे हा? २**
**हांक करालादेव्यालयांतुनी ही उठे बहुत दीन,**
**हें तों स्थान अनिष्टप्रद, न कळे दुःख काय पाहीन! ३**

असो. पहावें वरें काय आहे तें. (इकडे तिकडे फिरतो. इतक्यांत हातीं देवतापूजनाचें साहित्य घेऊन कपालकुंडला आणि अघोरघंट, व बळीच्या चिन्हांनीं युक्त अशी मालती, हीं येतात.)

**मालती**—हा ताता, निर्दया! तूं जिच्या योगानें राजाची मर्जी संपादणार होतास, त्या तुझ्या दीन कन्ये मालतीची पहा या वेळीं कशी ही दशा होत आहे? हायहाय! आई, तुझें हृदय केवळ स्नेहमय आहे. तुझाहि ह्या मेल्या दुर्दैवानें सर्वस्वी घात केला ग! हा भगवति कामंदकी! मालती ह्मणजे केवळ तुझे प्राण. हतभागी मालतीचें सर्व प्रकारें कल्याण करण्याचा तुझा उद्योग. त्या तुला

वृद्धपणीं मी दुःखास कारण झालेंना! हा प्रियसखी लवंगिके! आतां स्वप्नांत मात्र तुला माझी भेट! ह्या लोकीं तर मी तुला अंतरलें!

**माधव**—(स्वगत) हर हर! तीच ही कमलनयना! आतां माझी खातरी झाली. तर हिचा घात झाला नाहीं तोंच हिचें संरक्षण करितों. (त्वरेनें पुढें जातो.)

**अघोरघंट**—देवी चामुंडे! तुला नमस्कार असो, नमस्कार असो.

**कपालकुंडला**—

देवी! त्वत्क्रीडेतें नमितों, जेव्हां निशुंभ माराया
उद्युक्त जाहलिस तूं, आणिक सज्जन समस्त ताराया. १
भारें त्या दैत्याच्या पृथ्वी वांकोनि कूर्मपृष्ठातें
कांपवि, तेणें सर्वहि वाटे ब्रह्मांड कोसळुनि जातें. २
त्वद्वक्त्रघोरगर्तीं सातहि सागर पळामधें लपती,
ऐसा प्रताप पाहुनि आश्चर्यें शंकरादि सुर दिपती. ३

पद.

देवी चामुंडे! चामुंडे! असुरवधोद्धतदंडे! धृ०।
प्रचंड तांडव ब्रह्मांडाच्या मंडपिं करिशी देवी!
इंद्रवरुणयमकुबेरदिक्पतिपंक्ती तुजला सेवी. १
शिरिं ढळल्या करिचर्मातें सांवरितां, नखघातें
चंद्रबिंब हें विभिन्न होउनि तत्क्षणिं अमृत स्रवतें! २
त्याच्या स्पर्शें नृमुंडमाला सजीव होउनि सारी,
मुखें भयंकर पसरुनि करिते अट्टहास जी भारी. ३
पिशाचगण ते भीत होउनी स्तविती तुजला फार,
संकटसमयीं सर्व जगाची असशि तूंच आधार. ४
ग्रंथि देउनी भुजगांचि त्वां बाहुभूषणें केलीं,
श्वासोच्छ्वासें प्रसृत तयांचीं फणामंडलें झालीं. ५
फणांपासुनी विषानलाचें ज्योती उठतां कालीं,
भुजदंडातें हलविशि तेणें पर्वत पडती खालीं. ६
नेत्रांपासुनि निघतां उज्ज्वल अंगाराच्या राशी,
अलातचक्रासम शिर गरगर हलविशि तूं दिग्देशीं. ७

**डमरुध्वज तो गगनीं जातां नक्षत्रांची पंक्ती**
**विचलित होती, मुदित पूतना टाळ्या पिटिती, गाती. ८**
**कोलाहल तो ऐकुनि, गौरी भिउनि मिठी शिवकंठीं**
**घाली जेव्हां, तेव्हां हर्षित शिव झाला जगजेठी. ९**
**त्वन्नृत्याचें वर्णन ऐकुनि, हृष्ट होउनी, मातें,**
**तुष्टिपुष्टितें दे, जगदंबे ! अभीष्टसिद्धी, माते ! १०**
**देवी चामुंडे ! चामुंडे ! असुरवधोद्धतदंडे !**

**माधव**—( स्वगत ) काय हो हा अनर्थ !

**तीच कीं हो ही भूरिवसूबाला !**
**इतें घालुनियां रक्तपुष्पमाला,**
**वस्त्र इजला आरक्त नेसवीलें,**
**बळी द्याया ह्या स्थळीं आणियेलें. १**
**दुराचारी, पाखंड, पापवृत्ती,**
**कशी ऐशांच्या गवसलीस हातीं ?**
**लांडग्यांनीं घेरिली मृगी जैशी,**
**बापुडीची या गती झालि तैशी ! २**
**अहा ! सांपडली मृत्युच्या मुखीं ही,**
**दया दैवा ! तुज काडिमात्र नाहीं !**

**कपालकुंडला**—( मालतीस )

**तुझ्या प्रियाची स्मृति तूं मनांत**
**करीं, अला दारुण हा कृतांत ! ३**

**मालती**—हे प्राणप्रिया, हे प्राणनाथा माधवा, मी परलोकास गेलें तरी तुह्मी मालतीला विसरूं नका हो ! प्रेमीजनांस ज्याचें वरचेवर स्मरण होतें तें मरण पावलें तरी जीवंतच समजलें पाहिजे !

**कपालकुंडला**—अरेरे, ह्या वापड्या पोरीचें मन माधवावर गुंतलें आहे वाटतें !

**अघोरघंट**—( शस्त्र उगारून ) तें कांहीं असो, मी आतां इला देवीला अर्पण करितों.

**समीप पूजा मम देवि घेवो,**
**सुमंत्रसिद्धी मजलागिं देवो. १**

(मालतीवर शस्त्र उगारतो.)

**माधव**—(अकस्मात् पुढें होऊन मालतीस आपणाकडे ओढून घेऊन अघोरघंटास) अरे दुरात्म्या! पुढें येशील तर हा पहा मेलास ह्मणूनच समज!

**मालती**—(अकस्मात् माधवास पाहून) महासमर्थ माधव माझें रक्षण करो! (माधवाच्या गळ्यास घट्ट मिठी मारते.)

**माधव**—हे भाग्यवति, भिऊं नको!

**मरणसमयिं तूझ्या भीति टाकोनि मागें**
**प्रकट करुन मैत्री, पातला त्वत्सखा गे!**
**सुतनु! भिउं नको तूं, कंप टाकीं, स्वपाप**
**त्वरित कुमति भोगी पातकी हा अपाप! १**

**अघोरघंट**—आंः! कोणरे हा पापी, आह्मांला विघ्न करावयास आला?

**कपालकुंडला**—ह्या कन्येचा प्रियकर, कामंदकीच्या मित्राचा पुत्र, महामांसाचा विक्रय करणारा, ज्याला माधव ह्मणतात, तोच हा!

**माधव**—(डोळ्यांत पाणी आणून मालतीस) हे महाभाग्यवति, हें काय चाललें आहे? तूं येथें कशी आलीस?

**मालती**—(ब-याच वेळानें सावध होऊन) महाभागा, हें काय चाललें आहे, आणि मी येथें कशी आलें, हें मला कांहींच ठाऊक नाहीं! इतकें मात्र आठवतें कीं, मी गच्चीवर निजलें होतें, आणि येथें जागी झालें. पण आपण येथें कोठून आलां?

**माधव**—(लाजून)

**माझें जन्म असो कृतार्थ तुझिया पाणिग्रहानें, असा**
**चित्तीं निश्चय हा धरूनि शिणलों अत्यंत मी दीनसा;**
**मर्त्यांचें विकण्यास मांस फिरलों ह्या प्रेतभूमीवरी,**
**आलों ऐकुन रोदनस्वर तुझा, होऊं नको घाबरी! १**

**मालती**—(स्वगत) हरहर, माझ्यासाठीं आपल्या जिवाची देखील आशा सोडून हा महाभाग चोहोंकडे भटकावा ना?

**माधव**—( स्वगत ) अहो, हें कावळा बसावयास आणि ढाळी मोडावयास गांठ पडते, तसें झालें ! आतां—

दैवें राहुमुखांतली शशिकला जाणों हतीं लागली,
खड्गापासुनि दस्युच्या[1] त्वरित मीं माझी प्रिया रक्षिली;
कारुण्यें द्रवतें, भयें विवळतें, क्रोधें बहु क्षोभतें,
आश्चर्यें भ्रमतें, विकास मन हें हर्षें तसें पावतें. १

**अघोरघंट**—अरेरे ! ब्राह्मणाच्या पोरा—

व्याघ्र करूं पाहे हरिणीघाता, हरिण कृपाकुल जवळ असतां,
तेंवि ह्या सुंदरीस मारितां, माझ्या दृष्टी पडलास. १
तुजसारिखे जे पातकी, त्यांचा आधीं नाश करून हस्तकीं,
बळी देवोनि एकाएकीं, भूत जननीतें तृप्त करीन ! २

**माधव**—अरे दुरात्म्या, पाखंडा, चांडाळा!

हीतें मारायाला उन्मुख होउनि, संसारातें
असार करिशी, लोकीं तैसा पसरशि अंधारातें! १
रत्नरहित हें त्रिभुवन करिशी घेउनि हीचे प्राण,
बंधुजनांला इच्या लाविशी अवलंबाया मरण. २
कंदर्पातें[2] अदर्प[3] करिशी, निष्फळ जननयनांतें,
करूं पाहशी अरण्य केवळ अवघ्या या विश्वातें ! ३

आणखी, अरे पाप्या !

शिरीषाच्या पुष्पें मृदुमृदुहि संताडन तितें
सखींनीं केल्यानें त्वरित वपु संतापततितें[4]
तिचें पावे ! तेथें उचलिशि कसें शस्त्र ? शिरिं हा
पडो तूझ्या, माझा भुज यममहादंडसम हा. १

**अघोरघंट**—अरे दुरात्म्या ! मार, मार पाहूं ! तुला होतास कीं नव्हतास असें करून टाकतों !

**मालती**—नाथा ! कृपा कर. साहस करूं नको. हा मेला दुष्ट मोठा घातकी आणि निर्दय आहे. ह्मणून तूं ह्या अनर्थांत पडूं नको.

---

१ चोराच्या. २ मदनातें. ३ गर्वहीन. ४ संतापतति ह्मणजे पुष्कळ इजा.

**कपालकुंडला**—गुरु महाराज, फार खबरदारीनें ह्या मेल्या दुष्टास मारा. हा मोठा हुशार आहे.

**माधव**—( मालतीस ) }
**अघोरघंट**—( कपालकुंडलेस ) } अग भित्रे !

**तूं धैर्य चित्तीं धरिं, दुष्ट पापी**
**हा मारिला, गे ! न टिके कदापी !**
**करींद्रगंडस्थलभेदकारी**
**सिंहा, मृगाचा वध काय भारी ?** १

( जवळच गलबला होतो. ) अहो, मालतीचा शोध करणारे सैनिक हो ! उगीच्च वेड्यासारखे इकडेतिकडे धांवू नका. जिची प्रतिज्ञा कधींहि खोटी झाली नाहीं, व जिनें भूरिवसू अमात्यास पूर्ण भरंवसा दिला आहे, अशी भगवती कामंदकी तुह्मांला आज्ञा करित आहे—

**कराला देवीस द्यावया बळी, अघोरघंटें नेली सांवळी**
**मालती देवीच्या देवळीं; नसे हें घोर कृत्य दुजियाचें ! १**
**ह्या भयंकर कर्माचें फळ, देवीची तृप्ति हेंच केवळ,**
**बंद करा हें देऊळ, त्वरें करोनि तुह्मी आतां. २**

( सैनिक देवळाचीं दारें बंद करितात. )

**कपालकुंडला**—भगवंता, आपण अडकलों आतां.

**अघोरघंट**—आतां वरीक आपलें सामर्थ्य विशेषेंकरून दाखविण्याची वेळ आहे.

**मालती**—हाय हाय ताता ! हाय हाय भगवति !

**माधव**—आतां ह्या मालतीला बांधवजनांच्या स्वाधीन करून त्यांच्यादेखतच ह्या दुष्टाला मारितों. (मध्यें होऊन मालतीस आणि अघोरघंटास दोहों बाजूंस करून फिरतो. माधव आणि अघोरघंट एकमेकांस लक्षून ह्मणतात. ) अरे पाप्या !

**कठोरास्थिग्रंथीवरि पडुनि जो सध्वनि घडे,**
**शिराछेदें ज्याचा क्षणभरि महावेग विघडे;**
**जसा पंकीं[1], तैंवी असि[2] पिशित[3]पिंडांतरिं पडे,**
**करो त्वद्गात्राचे तिलसम अतां सर्व तुकडे !** १

[ सर्व जातात.

**[ पांचवा अंक समाप्त. ]**

---

१. चिखल. २ तरवार. ३ मांस.

# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला.

( विष्कंभक. )

[ स्थळ—राजमार्ग. मालती हत्तिणीवर बसून मोठ्या थाटानें देवीच्या दर्शनास निघाली आहे, असा प्रवेश. ]

**कपालकुंडला**—(प्रवेश करून) अरे मेल्या दुष्टा माधवा! त्या समयीं मालतीकरितां माझ्यासमक्ष माझ्या गुरूचा निर्दयपणानें वध करून तूं माझी अवज्ञा केलीस! ( क्रोधानें ) बरें आहे! तूं काय समजलास? कपालकुंडलेच्या क्रोधाचें फळ तुझ्या अनुभवास आल्यावांचून कदापि राहणार नाहीं, ही पुरी खातरी ठेव!

**ज्यानें भुजंग वधिला, ह्मणुनी जयाला**
**मारावयास टपली भुजगी विशाला;**
**दाढा सुतीक्ष्ण असती विषयुक्त जीच्या;**
**शांती कशी मनिं वसेल तया नराच्या? १**

( जवळच शब्द होतो. )

**वृद्धाज्ञेकरुनी तुह्मी, नृपतिनों! आचार सारे करा,**
**भूदेव[1] श्रुतितें पढोत अवघे सन्मंगला सुस्वरा;**
**बोलावीं शुभसूचकें सुवचनें, देवीस जाया महा**
**यात्रा सत्वर ही अतां निघतसे, सानंद तुह्मी पहा. १**

जोंपर्यंत वरपक्षाची मंडळी आली नाहीं, तोंपर्यंत मालतीला ग्रामदेवतेच्या दर्शनास घेऊन जावें व कांहींजणींनीं ह्या मंगलकार्याची निर्विघ्नपणें समाप्ति होण्याकरितां मालतीला घालावयासाठीं हातांत अलंकार घेऊन तयार असावें; अशी भगवती कामंदकीच्या सांगण्यावरून अमात्यस्त्रियांची आज्ञा झाली आहे.

**कपालकुंडला**—( स्वगत ) असो. मालतीच्या विवाहाविषयीं तयारी करणाऱ्या शेंकडो द्वारपाळांची येथें फार दाटी झाली आहे, तर आतां आपण येथून जाऊन माधवाचा घात करण्याची संधि सांपडण्यासाठीं टपत बसून रहावें. ह्या गडबडींत ती संधि कोठें तरी खचीत येईल.

[ जाते.

---

१ ब्राह्मण.

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—कराला देवीच्या मंदिरांतील गाभारा. कलहंस प्रवेश करतो. ]

**कलहंस**—( स्वगत ) ग्रामदेवतेच्या देवळांत मकरंदासहवर्तमान माधव बसला आहे. मालती देवीच्या दर्शनास निघाली किंवा नाहीं हें आपल्याला त्वरित कळविण्याविषयीं त्यानें मला आज्ञा केली आहे. तेव्हां मालती देवीच्या दर्शनास निघाली ही आनंदाची बातमी माधवास सत्वर जाऊन कळवूं या.

[ जातो.

( तदनंतर माधव आणि मकरंद येतात. )

**माधव**—

**प्रथम मालती निरखिलि जेव्हां, तेव्हांपासुनि ज्यास**
**अरंभ होउनि जिवास घडतो माझ्या बहु आयास. १**
**निज प्रीतीचीं बहुविध चिन्हें दावुनि वारंवार,**
**मृगनयनेनें दिवसेंदिवसहि वाढविलें जें फार; २**
**तें सरनाटक आज होतसे निश्चित समाप्त सारें,**
**साधो, किंवा फसो, तुझा श्रम, भगवति[1] करुणाधारे[2] ! ३**

**मकरंद**—मित्रा, भगवती एवढी बुद्धिमती असून तिची मसलत कशी बरें फसेल? कदापि फसणार नाहीं !

**कलहंस**—( पुढें होऊन ) धनीमहाराज, आपले मनोरथ पूर्ण झाले. मालती इकडे येण्यास निघाली !

**माधव**—हो खरेंच?

**मकरंद**—अरे, अविश्वास्यासारखें काय विचारतोस? ती केवळ निघाली इतकेंच नाहीं, तर अगदीं जवळ आली. ऐकत नाहींस का तूं?

**जैसे मेघ गर्जना करिती, तैसे हजारों मृदंग वाजती,**
**तेणें शब्दांतरग्रहणशक्ती[3] कुंठित आमुची होतसे. १**

चल तर, ये आपण खिडकींत बसून तिच्या स्वारीचा थाट पाहूं या.

**कलहंस**—महाराज, पहा पहा! हीं शेंकडो श्वेत छत्रें जणों काय आकाशरूपी सरोवरांतील शुभ्र कमळेंच अशीं शोभत आहेत; आणि या हजारों पांढऱ्या चवऱ्या वर उडत आहेत ह्या जणों काय राजहंस पक्षीच उडताहेत

---

१ हे कामंदकी. २ करुणेचें घर. ३ अन्य शब्द जाणण्याची शक्ति.

व त्यांच्या पंखांच्या वाऱ्यानें, शेंकडो हत्तिणींवर बसून चाललेल्या या तरुणी-जनांच्या अंबारींच्या खांबांला बांधलेलीं लहान लहान केळीचीं पानें फडफड हालत असल्यामुळें पताकांसारखीं शोभत असून अंबारींत बसलेल्या सुंदरींचीं मुखकमलें जणूं काय गगनांगणांतल्या सरोवरामध्यें एकसारख्या गर्दी करून राहिलेल्या प्रफुल्लित कमळांसारखी सुंदर शोभा देत आहेत! तसेंच, तांबूल खाल्ल्यामुळें ज्यांचे ओंठ आरक्त झाले आहेत आणि त्या तांबुलाच्या कवळामुळें ज्यांचे गाल फुगले आहेत व अशा स्थितींतच आनंदानें त्या सुंदरी मंगलगीतें गात असल्यामुळें मोठा रम्य ध्वनि निघत आहे! या सुंदरींनीं अंगावर अनेक रत्नांचे अलंकार धारण केल्यामुळें त्या रत्नांचे किरण एकमेकांत मिश्र होऊन आकाशांत इंद्रधनुष्याची अपूर्व शोभा आली आहे. हा रमणीय देखावा पाहून घ्या!

**मकरंद**—खरोखर, अमात्य भूरिवसूचें ऐश्वर्य अवर्णनीय आहे!

**अनेक रत्न किरणांचे चांदवे, येथें शोभती हे बरवे,**
**नील, माणकें, पाचू हिरवे, चोहोंकडे लखलखती. १**
**असंख्य किरणांच्या रेखा, चोहोंकडे उठती देखा,**
**व्यक्त करिती इंद्रकार्मुका[1], चोहोंभागीं पसरती. २**

**कलहंस**—मालती अगदीं जवळ आली! अरे, पण ही काय भानगड? सोन्यारुप्याच्या छड्या घेतलेल्या हिच्या भालदारांनीं आपल्या काठ्यांनीं मर्यादेसाठीं रेषा काढून त्या रेषेच्या आंत चाकरमाणसांच्या रांगा उभ्या केल्या आहेत. शेंदरानें सोंडेवर रंगिवलेल्या आणि नक्षत्रमाळांनीं शृंगारलेल्या, अशा काळ्या हत्तिणीवर भाग्यवती मालती बसली आहे. विरहव्यथेनें हिचें शरीर अगदीं कृश होऊन तोंडास पांढरकी आली आहे. सर्व लोकांनीं उत्सुक होऊन मोठ्या कौतुकानें इच्याकडे डोळे लावले आहेत. ह्या समयीं शुद्ध द्वितीयेस संध्या-काळच्या प्रभेनें तांबडी व नक्षत्रमालेनें युक्त अशा रात्रिमुखास शोभवणारी, शुभ्रवर्ण, सर्वलोकदर्शनीय, चंद्रकलाच काय अशी ही अमात्यकन्या भासत आहे!

**मकरंद**—मित्रा, पहा पहा!

**सूक्ष्म आणी पांडुरा अवयवांहीं**
**भूषणांतें भूषवी विशेषें ही!**

---

१ इंद्रधनुष्य.

**लता पुष्पें गोजिरीं वरुनि वाहे,**
**परी अंतरिं जी नित्य तोषताहे. १**
**विवाहाच्या या उत्सवप्रसंगीं,**
**हिरे मोतीं झळकती हिचे अंगीं,**
**रूपसंपत्ती काय ती वदावी,**
**तरी अंतरिंचें दुःख वदनें[1] दावी! २**

माधवा, हत्तीण खालीं बसविली !

**माधव**—( आनंदानें ) अरे, मालती हत्तिणीवरून खालीं उतरून कामंदकी आणि लवंगिका ह्यांसहवर्तमान इकडेसच येत आहे !

( तदनंतर कामंदकी, मालती, आणि लवंगिका तिघी येतात. )

**कामंदकी**—( सखीच्या कानाशीं लागून )

**विधी अस्मत्कार्याप्रति अनुसरो, देव सकळ**
**मनाच्या इच्छेचें लवकरिच देवोत सुफळ;**
**यवो मद्यत्नातें यश सुहृदपत्योपयमनीं[2]**
**कृतार्था होईन, प्रमुदित, तशी स्वस्थहि मनीं. १**

**मालती**—( स्वगत ) आतां मरण येईल तर या यातनांतून सुटेन ! परंतु मरणाचादेखील उपाय सुचत नाहीं. मजसारखीं जीं हतभाग्य असतात, त्यांनीं मरणाची इच्छा केली तर तेंसुद्धां त्यांनां प्राप्त होत नाहीं; किंवा त्यांनां तें प्राप्त होत नाहीं तें योग्यच आहे ! कारण, इच्छिलेलें मिळेल तर तीं हतभाग्य कसलीं?

**लवंगिका**—( स्वगत ) अरेरे ! ही माझी प्रियसखी विरहदुःखानें फारच गांजली आहे !

( इतक्यांत पेटी हातांत घेऊन द्वारपालिका येते. )

**द्वारपालिका**—अमात्यानें भगवतीस विनंति केली आहे कीं, राजानें हे दागिने पाठविले आहेत. हे देवीच्या पुढें मालतीच्या अंगावर घालावे.

**कामंदकी**—अमात्यानें योग्यच सांगितलें. हें मांगलिक स्थान आहे. दागिने येथेंच घातले पाहिजेत. काय काय दागिने आहेत, मला पाहूं दे.

**द्वारपालिका**—(पेटी उघडून) ही जरीकांठी चोळी; ही जरीलप्फ्याची साडी; ही भरगच्ची फडकी; हा मोत्यांचा कंठा; हा चंद्रहार, ही बिंदी, हीं कांकणें; आणखी हे सर्व दुसरे दागिने. हें कुंकू, हें चंदन, आणि ही मोत्यांची बाळी.

१ चेहरा. २ मित्रांच्या अपत्यांच्या विवाहानें.

**कामंदकी**—(स्वगत) हे अलंकार मकरंदाला चांगले शोभतील! (उघड) आण इकडे ते दागिने. अमात्याला सांग कीं, आपण सांगितल्याप्रमाणें आह्मी करितों.

**द्वारपालिका**—आज्ञा माई.

[ जाते.

**कामंदकी**—वत्से लवंगिके, तूं मालतीस घेऊन आंत जा.

**लवंगिका**—भगवति, आपण कोणीकडे जातां?

**कामंदकी**—मी एकांतीं बसून अलंकारांच्या रत्नांची परीक्षा करितें.

[ जाते.

**मालती**—(स्वगत) अगबाई, एकटी लवंगिका मात्र माझ्याजवळ राहिली!

**लवंगिका**—हें देवळाचें द्वार, चल, आपण आंत जाऊं. (आंत जातात.)

**मकरंद**—(हळूच) मित्रा, चल, आपण या खांबाच्या आड उभे राहूं. आड उभे राहतात.)

**लवंगिका**—हें उटी लावावयास केशरी गंध आणि ह्या फुलांच्या माळा.

**मालती**—गडे, आतां कशाला तें गंध आणि कशाला त्या माळा?

**लवंगिका**—सखी, असें काय बरें बोलतेस? आपलें कल्याण व्हावें ह्मणून ह्या मंगलकार्यांच्या आरंभीं देवतेची पूजा करावयासाठीं मातेनें तुला येथें पाठविलें आहे.

**मालती**—अग, माझें दैव फुटल्यानें अगोदरच माझें अंतःकरण दुःखानें जळून गेलें आहे, त्यांत आणखी मर्मभेदक भाषणांनीं उगीच माझ्या दुःखावर डाग कां देतेस?

**लवंगिका**—बोल, बोल तुझें ह्मणणें तरी काय आहे, तें एकदा स्पष्ट बोल. थांबलीस कां?

**मालती**—आणखी काय सांगूं? दुर्लभ वस्तूवर मन गुंतविणाऱ्या हतभागी प्राण्याच्या मनोरथाचा भंग होऊन अगदीं निराश झालेलें मनुष्य जें बोलणार तेंच! दुसरें काय असणार?

**मकरंद**—(हळूच) मित्रा माधवा, ऐकिलेंना?

**माधव**—होय ऐकिलें, परंतु हृदयास फारच असमाधान वाटतें.

**मालती**—गडे लवंगिके, तूं मला बहिणीसारखी आहेस! सखे, नाहींग

आतां माझ्यानें हें दुःख सोसवत ! ही तुझी अनाथ झालेली प्रिय मैत्रीण मालती आतां मरणाच्या दाराशीं ठेपली आहे ! अगदीं बाळपणापासून आपला उभयतांचा एकत्र सहवास होऊन मजवर तूं असंख्य उपकार करित असल्यामुळें तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास जडला आहे. त्याला अनुसरून तुला ही अशी शेवटची प्रेमाची मिठी मारून ( तिला आलिंगते ) प्रार्थना करितें कीं, माझ्या या शेवटच्या विनंतीस जर मान देणें असेल, तर माझी मूर्ति मनांत आणून तूं एकवार त्या सकल सौभाग्याचें धाम, सर्व मंगलाचें निधान अशा प्रिय माधवाचें आनंदभरित मुखारविंद माझ्याकरितां पोटभर पाहून घे, ह्मणजे माझ्यावर तुझे अगणित उपकार होतील !

**माधव**—( हळूच ) सख्या मकरंदा !

**म्लानास जीव, कुसुमास विकासणारीं,**
**सर्वेंद्रियांस सुख देउनि मोहणारीं,**
**ऐकोनि हीं अमृतवद्वचनें स्वकर्णीं**
**झालों कृतार्थ; सुकृता मम कोण वर्णी ! १**

**मालती**—सखे, त्याला भेट, असें मी तुला कां सांगतें, समजलीस ? अग, मला जीवदान देणाऱ्या त्या महाभागाला मी हतभाग्य परलोकास गेल्याची वार्ता ऐकून अत्यंत दुःख होईल, आणि त्या संतापाच्या भरांत तो कदाचित् आपल्या जीवाचें कांहीं बरेंवाईट करून घेईल. यासाठीं माझें तुझ्यापाशीं हेंच मागणें आहे, कीं त्या दुःखानें त्याचें शरीररत्न हरपणार नाहीं, आणि माझें स्मरण करून दुःखानें हा संसार टाकून विरक्त होऊन तो कोणीकडे तरी निघून जाणार नाहीं, अशी तूं तजवीज कर. ह्याप्रमाणें तूं केलें असतां, तुझा मी मोठा उपकार मानीन, व माझा जन्म कृतार्थ झाला असें समजेन.

**मकरंद**—अरेरे, काय हा दुःखाचा प्रसंग ह्या बापडीवर गुदरला आहे !

**माधव**—

**नैराश्यें भयभीतबुद्धि कशि ही झाली कुरंगेक्षणा,**
**हीचें रोदन दीन ऐकुनि मनोहारी[1] तसें तत्क्षणा**
**चिंता मद्धृदयांत येउनि उभी ठेली, विषादें मना**
**होतें दुःख विपत्ति, उत्सव, हिला भेटावया वासना. १**

१ मनोहारी हें रोदनाचें विशेषण.

**लवंगिका**—इडापिडा टळो आणि अमंगल नाश पावो. सखे मालती, तूं हें काय अमंगल भाषण करितेस? देव माझ्या सखीला उदंड आयुष्य देवो! मी नाहीं बाई यापुढें ही असली कांहींचेबाहींच बडबड ऐकायची!

**मालती**—सखे, तुह्मांला मालतीचा जीव मात्र प्रिय आहे, मालती कांहीं नको आहे!

**लवंगिका**—सखे, जीव पाहिजे आणि मालती नको, हें तूं काय बोलतेस? असें कधींतरी होईल का? तुझ्या बोलण्याचा अभिप्राय मला कळला नाहीं?

**मालती**—अग, माधवाची खचीत प्राप्ति होईल, अशीं तुह्मींच नाहीं का, आशा उत्पन्न होण्यासारखीं गोडगोड भाषणें वरचेवर बोलून आजवर मला जीवंत ठेवून शेवटीं हे घाणेरडे सोहळे माझ्या नशिबीं आणलेत! मी तयार असतांहि, ह्या शरीरावर दुसऱ्याची सत्ता असल्यामुळें, प्रिय माधवाची सेवा करायला मला मिळत नाहीं. ह्या पापाच्या परिहारार्थ मीं निश्चय केला आहे कीं, त्या माझ्या परमेश्वररूपी प्रियकराच्या परोक्षच त्याच्या गुणांचें कीर्तन करित निष्कलंकपणें प्राणत्याग करावा. तूं माझी प्रियसखी असशील, तर ह्या माझ्या मनोरथाच्या आड येऊं नको, एवढेंच तुझ्यापाशीं मागणें मागतें. (लवंगिकेचे पाय धरते.)

**मकरंद**—(स्वगत) आतां मात्र स्नेहाची आणि प्रेमाची पराकाष्ठा झाली!

(लवंगिका माधवास खुणेनें बोलाविते.)

**मकरंद**—(हळूच) मित्रा, चल, हो पुढें. लवंगिकेच्या ठिकाणीं उभा रहा.

**माधव**—अरे, यावेळीं मला कांहींएक सुचत नाहीं. तिच्या ठिकाणीं उभें राहण्यास भय वाटतें.

**मकरंद**—अरे, हो, असें व्हावयाचेंच! अभ्युदयाचें हें चिन्हच आहे. हूं, जा पाहूं झटपट तेथें उभा रहा, नाहीं ह्मणूं नको.

**माधव**—बरें आहे. (हळूच जाऊन लवंगिकेच्या ठिकाणीं उभा राहतो.)

**मालती**—(माधवास लवंगिका समजून) सखे, माझ्यावर दया कर, आणि इतका अनुग्रह माझ्यावर करच!

**माधव**—

**गे सखि! साहस टाकीं, रंभोरू! सोडिं आग्रहाला, गे!**
**विरहव्यथा तुझी ही पाहुनि मच्चित्त तळमळूं लागे.** १

**मालती**—सखे, मालती पायां पडून मागत असतां तिला नाहीं ह्मणणें तुला योग्य नाहीं.

**माधव**—( हर्षानें )

**काय सांगूं तूझिया वियोगाची**
**बहु होते वेदना मला साची,**
**हेतु माझा पूर्वीं एकवार,**
**उठुनि माझीया गळां मिठी मार.** १

**मालती**—( हर्षानें ) सखी ! मजवर तुझा मोठा उपकार झाला. आतां प्रियसखीचें पुनः दर्शन ह्या जन्मीं कोठून होणार आहे? आतां ही आपली शेवटचीच भेट! ( आलिंगन करून आनंदानें ) कमळाच्या गाभ्याप्रमाणें सुकुमार असा तुझा शरीरस्पर्श आज कांहीं निराळाच वाटतो! तुला भेटून आज मला फारच सुख झालें. सखी, तूं माझ्या वतीनें दोन्ही हात जोडून, पदर पसरून त्या माझ्या प्राणप्रियास विनंति कर कीं, "मी अत्यंत हतभाग्य, विकसित कमलापेक्षां सुंदर व पूर्णचंद्रासारखें आल्हादकारक असें आपलें मुख यथेष्ट पाहून माझ्या डोळ्यांस कृतार्थ केलें नाहीं. आपल्या चिंतनाची गोडी लागून वारंवार आपली मूर्ति मनांत येई, व तेणेंकरून आपल्यावर माझें प्रेम उत्तरोत्तर वाढत गेलें. आपल्या समागमाविषयीं कधीं सिद्धीस न जाणारे असे मोठमोठे मनोरथ करून मीं मनाच्या तळमळींत मोठ्या कष्टानें एकेक दिवस कंठिला. माझी ती अवस्था पाहून माझ्या सर्व सख्यांस दुःख होई—अशी विरहज्वराची तळमळहि पुष्कळ सोसली. स्वभावतः आनंद देणारें, परंतु माझ्या विरहाग्नीचा भडका करणारें असें चांदणें, आणि मलयपर्वतावरचा वारा, इत्यादि अनर्थहि जेमतेम करून सोसले. परंतु सांप्रत आशेचें मूळच तुटलें, त्यामुळें निरुपाय होऊन मीं परलोकीं जाण्याचा विचार केला." प्रियसखी लवंगिके, तूंहि या गरीब मालतीचें निरंतर स्मरण ठेव. सखे, मला माझ्या जीवाहूनहि प्रिय असलेला, व माधवानें आपल्या हातानें गुंफलेला हा बकुलपुष्पांचा हार, माझी आठवण ह्मणून आज मी तुझ्या स्वाधीन करितें; हा तूं नेहमीं आपल्या गळ्यांत बाळगित जा, व मालतीची जशी काळजी वाहत होतीस तशीच ह्या हाराचीहि काळजी वाहत जा. ( गळ्यांतून हार काढून माधवाच्या गळ्यांत घालित असतां भयानें दचकून मागें सरते. )

**माधव**—( स्वगत ) अहाहा !

**कर्पूरखंड, हरिचंदन, चंद्रकांत,**
**शैवाल, कोमल मृणाल, हिम प्रशांत,**
**ह्यांच्या रसें जणुं मदंग भिजोनि गेलें !**
**देतां अलिंगन हिनें सुख तेंवि झालें. १**

**मालती**—( स्वगत ) अगबाई ! लवंगिकेनें मला फसविलें तर मग !

**माधव**—सखे, आपलें मात्र दुःख सांगतेस, परंतु दुसऱ्याचें दुःख जाणत नाहींस, हें काय बरें ?

**मद्देहाला संतापज्वर आजवरी बहु झाला,**
**ध्यानीं स्वप्नीं भेटुनि तुजला कैसा तरि तो कठला. १**
**करिशी मजवरि प्रेम सखे ! तूं, धरुनि असा विश्वास,**
**मींहि नाहिं का दिवस काढिले, सोसुनि बहु आयास २**

**लवंगिका**—गडे, मीं कांहीं तुझी थट्टा केली नाहीं, ज्यानें करावयाची त्यानेंच केली ! मग मलाग बाई उगीच कां ठपका देतेस ?

**कलहंस**—( स्वगत ) वाहवा, काय चमत्कारिक तरी ही मसलत !

**मकरंद**—हे महाभाग्यवती मालती ! हा ह्मणतो हेंच खरें आहे.

**दयाळू तूं, ऐसें मनिं समजुनी धीर धरिला**
**महाकष्टें यानें, कठिण किति हा काळ कठिला;**
**अतां लाधोनीयां वर[1]कर तुझा कंकणधर,**
**सखा माझा पावो सकल सुखराशी लवकर. १**

**लवंगिका**—महानुभवा, हिनें प्रियाच्या गळ्यास मिठी मारून आलिंगन सुखसुद्धां अनुभविलें, आतां कंकणमंडित कर देण्याचें काय कठीण आहे ?

**मालती**—(स्वगत) हरहर ! ही लवंगिका कन्याजनास अनुचित अशी गोष्ट करण्याविषयीं मला उत्तेजन देते ! आतां काय करावें ?

( इतक्यांत कामंदकी येते. )

**कामंदकी**—( मालतीस ) बेटा, अशी घाबरल्यासारखी कां दिसतेस ?
( मालती कांपत कांपत कामंदकीच्या गळ्यांत मिठी घालते. )

---

१ वर=श्रेष्ठ.

**कामंदकी**—( मालतीची हनुवटी उचलून )

**दर्शनमात्रें परस्परांच्या तुह्मी मोहित झालां,**
**सोडुनि त्यास तुला अवडेना, तसेंच तुजविण त्याला. १**
**जडूनि ऐशी प्रीत झुरतसां रात्रंदिवस मनांत,**
**तो तुजसाठीं, तूं त्यासाठीं; अली ग्लानि शरिरांत. २**
**वेडे! आतां लाज पुरे ही, प्रियमुखकमला पाहीं,**
**विधिकौशल अणि मदनमनोरथ होत सफळ लवलाहीं. ३**

**लवंगिका**—भगवति, कृष्णचतुर्दशीच्या काळोख्या रात्रीं स्मशानांत निर्भयपणें संचार करून आपलें मांस विकण्याचें घोर कर्म करणाऱ्या व आपल्या भुजदंडानें त्या मेल्या प्रचंड पाखंडी अघोरघंटाला नाहींसा करणाऱ्या या साहसी माधवाला पाहून माझी प्रियसखी भयानें कांपूं लागली, ह्यांत नवल तें काय आहे?

**मकरंद**—(स्वगत) वाहवा, शाबास! लवंगिके, तूं योग्य प्रसंगीं प्रेमा आणि उपकार ह्यांची सूचना केली! ह्याचें नांव समयोचित भाषण!

**मालती**—हा ताता, हा आई!

**कामंदकी**—वत्सा माधवा!

**माधव**—काय आज्ञा मातोश्री?

**कामंदकी**—समस्त मांडलिक राजे ज्याच्या चरणांस लागतात, अशा अमात्य भूरिवसूचें एकुलतें एक हें कन्यारत्न मालती, समसमान गुणांचा संयोग करण्याविषयीं रसिक[1] असा ब्रह्मदेव, कामदेव, आणि मी अशीं तिघें मिळून तुला देत आहों. (डोळ्यांत पाणी आणिते.)

**मकरंद**—भगवतीच्या चरणप्रसादेंकरून आज आमचे मनोरथ पूर्ण झाले!

**माधव**—पण भगवतीच्या डोळ्यांत पाणी कां आलें बरें?

**कामंदकी**—(वल्कलाच्या पदरानें डोळे पुसून) बाबा, तुला कांहीं सांगावयाचें आहे.

**माधव**—आज्ञा करावी मातोश्री.

---

१ प्रीति धरणारा.

**कामंदकी**—

**प्रीती ही परिणामरम्य[1] असते युष्मादृशांची[2], तुला**
**आहें मी बहुमान्यही तसतशा हेतूंमुळें, बा मुला !**
**हीची प्रीति तुझ्यावरी किति असे, जाणोनि हेंही मनीं,**
**हीतें अंतर सर्वथा न करणें हें मागतें प्रार्थुनी. १**

( माधवाच्या पायां पडूं लागते. )

**माधव**—( तिचें निवारण करून ) मातोश्री, आपली ममता ह्या लेंकरावर अपार आहे. तरी आपण पायां पडून मला पापांत घालूं नये.

**मकरंद**—भगवति,

**जी विख्यात कुलीं अशा निपजली, लावण्यखाणीच जी,**
**जीच्या प्रेम वसे मनीं बहु, असे चातुर्यभांडार जी,**
**तीचा हा गुण एक एकहि पुरे चित्तास मोहावया,**
**दिल्ही आपण ही अतां न उरलें कांहींच बोलावया ! १**

**कामंदकी**—वत्सा माधवा !

**माधव**—काय आज्ञा मातोश्री ?

**कामंदकी**—वत्से मालती !

**लवंगिका**—माई काय ?

**कामंदकी**—

**प्रियमित्र, बंधुजनही, स्त्रीचा भर्त्ताच होय परमार्थ,**
**जीवित, सर्वस्व तसें, दैवत, निधि, तो समस्त पुरुषार्थ. १**
**तैसेंचि धर्मपत्नी पतिचें गणगोत, सर्व अवघें हें,**
**अन्योन्य तुह्मी स्वमनीं समजा मद्वचनसार दोघें हें. २**

**मकरंद**—
**लवंगिका**— } भगवतीची आज्ञा शिरसावंद्य आहे.

**कामंदकी**—वत्सा मकरंदा, हुं, आतां विलंब नको ! तूं हे विवाहसंबंधी मालतीचे अलंकार आपल्या अंगावर घालून पुढच्या संकेताप्रमाणें आपला विवाह करून घे. ( अलंकारांची पेटी मकरंदास देते. )

---

१ शेवटपर्यंत गोड. २ तुह्मांसारख्यांची.

**मकरंद**—भगवति, आपल्या आज्ञेप्रमाणें करितों.

( पडद्यांत जाऊन अंगावर सर्व अलंकार घालितो. )

**माधव**—भगवति, माझ्या मित्रास यांत संकट आणि त्रास होणार नाहींना?

**कामंदकी**—अं: ! तुला कां त्याची काळजी?

**माधव**—भगवतीची काळजी भगवतीलाच, मी कशाला करूं ?

( इतक्यांत मकरंद नटून येतो. )

**मकरंद**—( हंसून ) मित्रा, मी मालती झालों पहा!

( सर्व कौतुकानें पाहतात. )

**माधव**—( मकरंदाचें आलिंगन करून थट्टेनें) भगवति, त्या नंदनाचें मोठेंच भाग्य समजलें पाहिजे! नाहींतर अशी सुंदर बायको त्याला कोठून मिळायला?

**कामंदकी**—वत्स माधव! बेटा मालती! तुह्मी दोघेंहि आतां ह्या समोरच्या झाडींतून जाऊन पलीकडे आमचा मठ आहे तिकडे जा. मठांतल्या बागेंत अवलोकितेनें लग्नाचें सर्व साहित्य तयार करून ठेविलें आहे. आणखी,

**केरलदेशांतील स्त्रिया बहुत, पतीसाठीं ज्या उत्कंठित,**
**त्यांच्या गालांपरी जाहल्या श्वेत, तांबूलवल्ली शोभती. १**
**ऐशीं जीं तांबूलीचीं दळें, तींहीं पूगीफलवृक्ष लवले,**
**भक्षोनियां कंकोलफलें, पक्षी करिती मधुर शब्द. २**
**जेथें बागेच्या सभोंवती, महाळुंगाची ताटी शोभती,**
**ते भूप्रदेश तुमच्या चित्तीं, आनंद देवोत अत्यंत. ३**

तेथें गेल्यावर तुह्मीं विवाहविधि संपादून, मकरंद आणि मदयंतिका हीं येत तोंपर्यंत तेथेंच असावें.

**माधव**—( आनंदानें ) कल्याणाची वेळ आली ह्मणजे उत्तरोत्तर कल्याणच होऊं लागतें!

**कलहंस**—वाहवा ! ही दुसरी गोष्ट घडून येईल तर मोठीच मौज झाली ह्मणावयाची !

**माधव**—ह्याविषयीं तुला अझून संशय आहे ?

**लवंगिका**—प्रियसखी, ऐकिलेंना ?

**कामंदकी**—वत्सा मकरंदा, इकडे ये. वत्से लवंगिके, इकडे ये. चला आपण येथून जाऊं.

**मालती**—सखे लवंगिके, तूंहि चाललीस मला एकटी टाकून ?

**लवंगिका**—( हंसून ) आतां बाई मी दोघांत तिसरी कशाला पाहिजे ?

[ कामंदकी, लवंगिका, आणि मकरंद जातात.

माधव—

**रोमांचकंटक जयावरी, बाहू शोभे नालापरी,**
**अंगुलीदलें शोभती भारी ऐसें जीचें करकमल. १**
**तें मी कामसंतप्त ह्मणून, धरीन निजहस्तेंकरून,**
**हस्ती जैसा सरोवरांतून, कमल धरितो स्वकरानें. २**

[ सर्व जातात.

[ चौरिकाविवाहनामा सहावा अंक समाप्त. ]

# अंक ७ वा.

## प्रवेश १ ला.

### ( प्रवेशक. )

[ स्थळ—नंदनाच्या वाड्याजवळील राजमार्ग.

बुद्धरक्षिता प्रवेश करिते. ]

**बुद्धरक्षिता**—कायतरी बाई नवल! भगवतीच्या मसलतीनें मालतीचा वेष घेऊन मकरंद भूरिवसूच्या वाड्यांत गेला व ही मालतीच आहे असें समजून नंदनानें मकरंदाचेंच पाणिग्रहण केलें! भगवती कामंदकीचें काय हें चातुर्य! ही मालती आहे कीं नाहीं, असा कोणाच्याहि मनांत काडीमात्रसुद्धां संशय आला नाहीं! खरेंच, एकंदरीनें मोठी गम्मत उडाली! ( आपल्याशींच मोठमोठ्यानें हंसते. ) आज आह्मी सर्व नंदनाच्या घरीं गेलों होतों. तेथून भगवती कामंदकी नंदनाचा निरोप घेऊन आपल्या घरीं गेली. आज सायंकाळीं नवऱ्यामुलीचा गृहप्रवेश आहे, त्याच्या तयारीला सर्व सेवक लागतील. त्या गडबडींत आमची मसलत साधेल खचीत! (हंसून) काय हो त्यावेळीं मौज घडली तरी! नंदन कामातुर होऊन मालती असेंच समजून मकरंदाच्या पायां पडून लाडीगोडी लावूं लागला, परंतु तो हूं कीं चूंहि करीना! तेव्हां जबरीचाहि प्रकार त्यानें आरंभिला होता; पण मकरंदानें रागावलेंसें करून त्याला लाथ मारिली. त्यामुळें बिचाऱ्याचा अगदीं हिरमोड होऊन बोबडी वळली. नेत्रांतून अश्रुधारा सुरू झाल्या आणि रागाच्या भरांत तो शपथ वाहून बोलला कीं "तूं लग्नाच्या अधींपासूनच वाईट चालीची आहेस, हें मला ठाऊक आहे. या उपर मी तुझें मुखावलोकन करणार नाहीं!" असें ह्मणून रागारागानें तो घरांतून निघून गेला. आतां मकरंद व मदयंतिका ह्यांची गांठ घालण्यास ही संधि फार चांगली आली आहे, तर तसेंच करावें.

[ जाते.



## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—भूरिवसूच्या वाड्यांतील अंत:पुर. सुसज्जित पलंगावर मालतीचा वेष घेऊन मकरंद बसला आहे, जवळच लवंगिका उभी आहे, असा प्रवेश. ]

**मकरंद**—लवंगिके, बुद्धरक्षिता गेली तिकडे गेली! भगवतीची मसलत फसायची तर नाहींना?

**लवंगिका**—महाभागा, आपणास हा संशय कां येतो? महाराज, आतां अधिक सांगण्याची गरजहि उरली नाहीं. कान द्या, पायांतील पैंजणांचा शब्द ऐकूं येत आहे, ह्यावरून मला वाटतें कीं, ती मसलत सिद्धीस जाऊन बुद्धरक्षितेनें मदयंतिकेला इकडे आणलें खचीत! आतां आपण तोंडावरून पांघरूण घेऊन झोंप लागल्यासारखें पडून रहा. ती पहा आलीच मदयंतिका!

( मकरंद निजल्याचें सोंग घेतो. इतक्यांत बुद्धरक्षिता आणि मदयंतिका येतात. )

**मदयंतिका**—सखी, मालतीनें खरेंच का माझ्या दादाला झिडकारून नाराज केलें?

**बुद्धरक्षिता**—अग, मी तुला खोटें सांगेन का?

**मदयंतिका**—असें असेल तर ही गोष्ट फार वाईट झाली! चल, त्या हट्टी, दांडग्या पोरीची आपण चांगली कानउघाडणी करूं.

( इकडे तिकडे फिरतात. )

**बुद्धरक्षिता**—हें रंगमहालाचें दार. चल, आपण आंत जाऊं.

**मदयंतिका**—( प्रवेश करून ) सखी लवंगिके, पहा पहा बरें, तुझ्या प्रियसखी मालतीस झोंप लागली आहे कीं काय ती?

**लवंगिका**—सखी, आतांपर्यंत ती विचारी त्रासांत आणि रागांत सारखी तळमळत होती; आतांच तिचा राग थोडासा शांत होऊन नुकताच कोठें अमळ डोळा लागला आहे. तिला बिचारीला जागें करूं नको. ये इकडे, हळूच येऊन पलंगावर बैस येथें.

**मदयंतिका**—( पलंगावर बसून ) सखी, या हट्टी पोरीला एवढें रागवायला काय बरें झालें?

**लवंगिका**—अल्लड अशा नव्या नवरीचें मन वश करून घेण्याविषयींच्या कामीं मोठा कुशल, मधुर आणि खुमारीदार भाषण करणारा, अत्यंत प्रेमळ, आणि राग ह्मणून ज्या बिचाऱ्याला कधींच ठाऊक नाहीं, असा तुझा दादा नवरा मिळाल्यावर माझ्या प्रियसखीला रागवायला काय झालें मेलें !

**मदयंतिका**—बुद्धरक्षिते, पाहिलें ना ? ही लवंगिका उलटें आह्मांलाच कशी लावून बोलते ती ?

**बुद्धरक्षिता**—कोणाला ठाऊक उलटें बोलते, कीं सुलटें बोलते ती ?

**मदयंतिका**—असें ग तूं काय बोलतेस ?

**बुद्धरक्षिता**—अग, नवरा पायां पडला असतांहि मालतीनें त्याचा मान ठेविला नाहीं, हें खरें; पण ह्याबद्दल तिला दोष लावितां येत नाहीं. कारण, ती गोष्ट लज्जेमुळें होते; आणि अल्प वयांत लज्जा स्वाभाविकच आहे. पण सखे, नव्या नवरीशीं एकाएकीं उतावळेपणा केल्यामुळें तिनें लज्जेच्या योगानें झिटकारलें असतां, आपण रागावून, हलक्यासारखें तिला दुर्भाषण बोलावें, हें तुझ्या दादाला मुळींच शोभत नाहीं ! हा सारा दोष तुमच्याकडेच दिसतो, मालतीकडे कांहीं नाहीं, असें आह्मांला वाटतें. तसेंच कामशास्त्रकर्त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, स्त्रियांची आणि पुष्पांची जात एकसारखीच सुकुमार आहे. ह्यास्तव त्यांनां फार जपूनच हात लाविला पाहिजे. त्यांचें सेवन दांडगाईनें व घाईघाईनें करण्याचा प्रयत्न केल्यास तीं अगदीं बिघडून जातात.

**लवंगिका**—( डोळ्यांत पाणी आणून ) घरोघर पुरुष कुलीन कन्यांशीं विवाह करितात, पण बाई, तुमच्या घरची मुलखानिराळीच रीत ! असा चमत्कार आपण बाई कोठें कोठेंच पाहिला नाहीं ! निरपराधी व नाजुक अशा अल्लड, पोर-सवदा बायकोवर—ती आपली बायको झाली ह्मणून—तिचा दुसरा कांहीं अपराध नसतां, केवळ लाजाळूपणास्तव नवऱ्यानें अरेरावपणानें तोंड सोडून भलतीच आग पाखडतांना आपण नाहीं कधीं पाहिलें व ऐकिलें ! असले कठोर शब्द –शब्द कसले–जळजळणाऱ्या डागण्याच त्या ! कुलीन कन्यांच्या हृदयांत शल्य-प्रमाणें राहून त्यांनां मरेपर्यंत दुःख देतात ! नवऱ्याच्या घराचा त्यांनां तिटकारा येतो व सासरीं रहाण्यास त्यांचीं मनें विटतात, तीं यामुळेंच ! हो, असा अपमान कोणाला बरें सहन होईल ? आणि तेणेंकरून बिचाऱ्यांचें जन्माचें संसारसुख नाहींसें होतें ! ह्यामुळेंच लोकांत ह्मण पडली आहे कीं, पोर मुळींच नसलें तरी पुरवलें, पण पोटीं पोरगी नको व तिचें दुःखहि पहावयाला नको !

**मदयंतिका**—बाई बुद्धरक्षिते, माझी प्रियसखी लवंगिका फार संतापली आहे; ह्यावरून माझा दादा मालतीला फारच वाईट दुर्भाषण बोलला असावा, असें वाटतें.

**बुद्धरक्षिता**—होय, असेंच मींहि ऐकिलें आहे.

**मदयंतिका**—सखी, दादा तिला काय दुर्भाषण बोलला ?

**बुद्धरक्षिता**—"तूं लग्नाच्या आधींपासूनच वाईट चालीची आहेस! तुझी मला अगदीं गरज नाहीं! मी तुझें मुखावलोकनहि करणार नाहीं!" इत्यादि कठोर शब्द तो बोलला, असें ऐकिलें आहे.

**मदयंतिका**—( कानांत बोटें घालून ) बाई, पुरे कर! नको सांगू! माझ्यानें असले अभद्र शब्द ऐकवतदेखील नाहींत! अहो, केवढा हा मूर्खपणा? काय अमर्यादा ही? सखी लवंगिके, आतां माझ्यानें तुला तोंडदेखील दाखववत नाहीं! पण गडे, मी थोडेंसें बोलूं का ?

**लवंगिका**—आह्मी तुझ्याच आहों! तुला जें कांहीं बोलावयाचें असेल तें खुशाल बोल.

**मदयंतिका**—मी हेंच सांगतें कीं, माझ्या भावाचा द्वाडपणा आणि त्याची वाईट रीति हीं एकीकडे राहूंद्या, परंतु तो ज्या अर्थीं मालतीचा नवरा झाला, त्या अर्थीं आतां त्याच्या मनाप्रमाणें तुह्मांला वागणें प्राप्त आहे. दुसरें असें कीं, कुलीन स्त्रियांनां बोलूं नये असें दुर्भाषण मालतीस तो बोलला, हें त्यानें वाईट केलें खरें; परंतु तो असें कां बोलला ह्याचें कारण तुह्मांला ह्मणजे अगदींच ठाऊक नाहीं, असें नाहीं !

**लवंगिका**—नाहीं बाई, कारणबिरण आह्मांला कांहींएक ठाऊक नाहीं !

**मदयंतिका**—अग, त्या माधवावर मालतीचें पराकाष्ठेचें मन जडलें आहे, व उभयतांचीं प्रेमाचीं भाषणेंहि झालीं आहेत, असा नगरांत सर्व लोकांत मनस्वी गवगवा झाला आहे, त्याचेंच हें फळ आहे, समजलीस? तर प्रियसखी लवंगिके,ज्या वागणुकीनें मालतीच्या नवऱ्याच्या मनांतला हा संशय अगदीं निःशेष निघून जाईल, अशी तुह्मीं वागणूक ठेववा. नाहीं तर कांहीं भलतेंसलतेंच होईल, हें लक्ष्यांत आणा. कारण, कन्येविषयीं कांहीं वाईट शंका उत्पन्न झाली असली ह्मणजे, ती पुरुषाच्या हृदयांत सर्वकाळ डंवचत असते. मी असें असें बोललें, ह्मणून मालतीला सागूं नका हो मात्र !

**लवंगिका**—तुझें चित्त ठिकाणीं नाहींसें वाटतें? जा जा, ठाऊक आहेस! लोकांतल्या पोकळ गप्पांवर विश्वास ठेवून भलतीसलती बडबड करितेस? जा, निघ येथून, तुझ्याशीं भाषणदेखील करूं नये!

**मदयंतिका**—सखी, रागावूं नकोस अशी! माझें बोलणें तुला वाईट लागलें असेल तर क्षमा कर. पण बाई, तुह्मी असें मोघम मोघम कां बरें बोलतां? मालतीचें मन केवळ माधवावरच आहे, हें काय आह्मांला कळत नाहींसें तुह्मांला वाटतें? विरहज्वर लागून इच्या तोंडावर आलेली पांढुरकी, केवड्याच्या कोवळ्या पानासारखें सुकून गेलेलें व त्यामुळें विशेष रमणीय दिसणारें इचें शरीर, तसेंच माधवानें आपल्या हातानें गुंफिलेली बकुळीच्या फुलांची माळ गळयांत घालून व ती अत्यंत अपरूप मानून आणि वरचेवर तिच्याकडे पाहूनच केवळ ही प्राण धारण करिते, इत्यादि गोष्टी कोणाला बरें ठाऊक नाहींत? तसेंच, त्या दिवशीं कुसुमाकर बागेजवळील राजमार्गाच्या तोंडावर आपली सर्वांची गांठ पडली होती त्या वेळीं मालती आणि माधव यांचे परस्पर चकित, उल्हासयुक्त, सकौतुक आणि आतुर असे मदनपरवशतेच्या विकारामुळें होणारे प्रेमाचे कटाक्ष आपण पाहिले नाहीं का? आणि तितक्यांत महाराजांनीं मालती माझ्या दादाला दिल्याचें वर्तमान ऐकतांच, मालती आणि माधव ह्यांचीं तोंडें कशीं खर्कन् उतरलीं आणि विस्तवाच्या धगीनें जसें एखादें फूल कोमेजून जातें तशीं म्लान होऊन गेलीं, तें मीं स्वतः पाहिलें नाहीं का? हो पण, मला आणखीहि एक गोष्ट आठवली!

**लवंगिका**—आणखी काय बाई? ऐकूंदे तर एकदाचें!

**मदयंतिका**—अग, त्यावेळीं, मला जीवदान देणारा तो महा भाग्यवंत सावध झाल्याचें प्रिय वर्तमान मालतीनें माधवास सांगितलें असतां, भगवती कामंदकीच्या सूचनेवरून माधवानें मालतीला आपलें हृदय आणि जीवित बक्षिस ह्मणून दिलें, आणि लवंगिके, मालतीच्या वतीनें त्यावेळीं तूंच नाहीं का ह्मटलेंस कीं, माझ्या प्रियसखीनें हें बक्षीस मोठ्या संतोषानें स्वीकारिलें ह्मणून?

**लवंगिका**—हो गडे खरेंच! पण तो महाभाग कोण, हें मी अगदींच विसरलें!

**मदयंतिका**—गडे, स्मरण कर, स्मरण कर! जेव्हां मी त्या व्याघ्ररूप काळाच्या दाढेंत सांपडलें, तेव्हां मला कोणी त्राता नव्हता, व ज्यानें अकारणबंधुत्व प्रकट करून आपल्या पुष्ट भुजदंडांच्या पराक्रमेंकरून सर्व भुवनांत अमोलिक

असा आपला देह धोक्यांत घालून माझ्या प्राणाचें संरक्षण केलें, व ज्याच्या अंगास वाघानें पंजे मारून अत्यंत पीडा दिली असतांहि ज्यानें माझ्याकरितां त्या दुष्ट व्याघ्राचे प्रहार साहून त्याला ठार मारलें, तो भाग्यवंत तुला नाहीं का आठवत ?

**लवंगिका**—हं हं, मकरंद का ?

**मदयंतिका**—(आनंदानें विव्हळ होऊन) प्रियसखी, काय—काय ह्मटलेंस ?

**लवंगिका**—अग, दुसरें काय ह्मणणार ? मकरंद कीं काय असें ह्मणतें ? (इच्छापूर्वक मदयंतिकेच्या अंगास स्पर्श करून)

**आह्मांवरी तूं धरितीस शंका !**
**तशाच आह्मी! परि तूं अशी कां**
**झालीस गे ! अन्यकथेकरोनी**
**रोमांचितांगी कुलजा असोनी ?** १

**मदयंतिका**—( लाजून ) सखी, तूं उगीच कां माझी अशी थट्टा करितेस ? ज्यानें आपल्या जीवाची यत्किंचित्‌हि पर्वा न करितां काळाच्या दाढांतून माझा जीव माघारा आणिला, अशा त्या उपकारकर्त्याचें नांव किंवा गोष्ट निघाली असतां, मला आनंद होणें साहजिकच आहे. अग, ज्यानें माझ्याकरितां आपला अमोलिक असा जीव तृणासारखा तुच्छ मानून मला वांचविलें, त्या वेळेस त्या महाभागाची अवस्था कशी झाली होती! वाघाच्या नखांच्या प्रहारांच्या वेदनेनें मूर्च्छा येऊन त्याच्या अंगाला घाम सुटला, त्यानें डोळे मिटले, ओंठ अगदीं सुकून गेले व त्यानें हातांतली तरवार जमिनीवर टेंकून तीवर आपलें शरीर सांवरून धरिलें होतें. प्रियसखी, हें सर्व, तूंहि प्रत्यक्ष पाहिलेंच आहे ! (रोमांचित होऊन कांपूं लागते. )

**बुद्धरक्षिता**—हो, प्रियसखीच्या शरीराची स्थितीच तें स्पष्ट सुचवित आहे !

**मदयंतिका**—जा गडे ! मैत्रिणीच्या विश्वासामुळें मीं माझ्या मनांतील उद्गार मोकळेपणें प्रकट करून अशी फजिती करून घेतली !

**लवंगिका**—सखी, आह्मांला तें समजत नाहीं, असें का तूं समजतेस ? अग वेडे, तूं कशाला एवढी उगीचे उगीच लपंडाव करतेस ? चल ये, आपण मन मोकळें करून हितगुजाच्या गोष्टी बोलत बसूं.

**बुद्धरक्षिता**—खरेंच, सखी लवंगिकेचें ह्मणणें योग्य आहे.

**मदयंतिका**—आणि मी तुमच्या शब्दाबाहेर थोडीच आहें! चला, तुमच्या मर्जी प्रमाणेंच होऊं द्या.

**लवंगिका**—खरें ना हें? तर मग आतां सांग पाहूं, सखी! तुझा वेळ तरी कसा जातो?

**मदयंतिका**—सखे, ऐक सांगतें. बुद्धरक्षितेच्या सांगण्यावरून त्या सुंदर पुरुषावर पूर्वींच माझी पराकाष्ठेची प्रीति बसून त्याला पाहण्याची मनाला मनस्वी उत्कंठा लागली होती. पुढें दैववशेंकरून त्याचें दर्शन झालें व त्या दिवसापासून अनिवार्य मदनपीडेनें माझा जीव व्याकुळ होत आहे. रात्रंदिवस चैन पडत नाहीं, सर्वांगांत मदनज्वराचा संचार होऊन त्या आयासानें मी वांचतें कीं मरतें, अशी माझ्या जिवलग मैत्रिणींस काळजी वाटूं लागली आहे. सांप्रत माझ्या मनाला इतक्या कांहीं असह्य वेदना होत आहेत कीं, प्रियजनाच्या लाभाची मीं आशा मात्र सोडिली पाहिजे, ह्मणजे तत्क्षणीं या देहांतून प्राण निघून जाईल, आणि मी ह्या वेदनेंतून सुटेन! ह्या बुद्धरक्षितेच्या आश्वासनावरूनच जीव गुंतून राहिला आहे व त्या आशेवरच मी कसेतरी कष्टानें दिवस कंठित आहें! प्रियसखी, काय सांगूं? त्या महाभागाचा ध्यास लागल्यामुळें ध्यानीं, मनीं, स्वप्नीं त्याची ती रमणीय मूर्ति माझ्यापुढें उभी राहते व त्याला पाहून मी अगदीं मोहित होतें. स्वप्नांत मी वारंवार पाहतें कीं, तो महाभाग आपल्या धुंद, प्रेमळ, चंचळ आणि आतुर अशा दृष्टीनें मजकडे टक लावून पाहत आहे, आणि 'हे प्रिये मदयंतिके!' असें ह्मणून मला हांक मारित आहे. कमळाचीं केसरें खाऊन ज्याच्या कंठास माधुर्य प्राप्त झालें आहे, अशा राजहंसाच्या शब्दाप्रमाणें त्या महाभागाचा तो गंभीर आणि मधुर असा शब्द माझ्या कानांत अमृतासारखा भरत आहे! सखे, त्यावेळीं स्तन स्फुरण पावून अंगावरचा पदर गळून पडतो. तसेंच केव्हां केव्हां तो माझ्याशीं लगट करावयास येतो त्यावेळीं आतां हा माझ्या अंगावरचा शेला ओढतो कीं काय अशी भीति वाटून माझें काळीज धडधड उडूं लागतें व त्या भीतीनें बावरी होऊन मी तो शेला टाकून पळूं लागतें व पळतांना स्तन उघडे दिसूं नयेत ह्मणून आपल्या दोन्हीं बाहूंनीं ते झांकून घेतें. या गडबडींत कमरेंतील मेखला सैल होऊन गळून दोन्ही पायांत अडखळूं लागते व त्यामुळें लवकर पळूनहि जातां येत नाहीं! तसेंच तो गोड गोड बोलून माझ्याशीं लाडीगोडी लावूं लागला असतां, मी रागावल्यासारखें करून दाखवितें व त्यानें पुन्हा माझ्याशीं बोलूं नये ह्मणून वारंवार डोळे वटारून त्याच्याकडे पाहूं

लागतें, परंतु माझा अभिप्राय जाणून तो उलट माझी अधिकच थट्टा करूं लागतो व विनोदानें हांसूं लागतो. प्रियसखी, एखादे वेळेस तो मोठ्या वेगानें येऊन मोठ्या आवेशानें माझी वेणी धरितो, व माझ्या डाव्या गालावर आपला पुंजित अधर ठेवून बळेंच माझें चुंबन घेतो, आणि मला पोटाशीं घट्ट कवटाळून धरितो, तेव्हां माझ्या सर्वांगावर रोमांच येतात व मी भयानें व आनंदानें कावरीबावरी होऊन त्याच्याकडे पाहूं लागतें. अशा वेळीं तो कांहीं भलतेंच साहस करूं लागतो व अविचाराचें कृत्य करण्यास प्रवृत्त होऊन नाहीं नाहीं त्या गोष्टी काढूं लागतो! गडे, त्या तुला सांगावयासदेखील मला लाज वाटते! पण याप्रमाणें अनेक प्रकारच्या सुखानंदांत मी गर्क झालें आहें, इतक्यांत मध्येंच एकाएकीं जागी होतें, आणि भोंवतालीं पाहूं लागतें, त्यासरशीं एकदम सर्वत्र शून्यारण्यासारखा प्रकार पाहून माझी स्थिति अगदींच दीन व खिन्न होते. अशा तऱ्हेनें मी कशी तरी दिवस कंठित आहें!

**लवंगिका**—(हंसून) मदयंतिके, खरें सांग, त्या समयीं तुझ्या शयनावर विलासाचीं कांहीं चिन्हें झालीं असतां, तीं आपल्या परिजनांच्या दृष्टीस पडूं नयेत ह्मणून बुद्धरक्षितेच्या खुणेवरून पलंगपोस घालून तींतूं झांकित असतेस कीं नाहीं?

**मदयंतिका**—जा गडे! ही कोण मेली भलतीच थट्टा? असला चावटपणा मला आवडायचा नाहीं हां, सांगून ठेवितें. अशानें मी नाहीं तुझ्याशीं मुळींच बोलायची!

**बुद्धरक्षिता**—सखे मदयंतिके, कसें झालें तरी ही लवंगिका-मालतीचीच सोबतीण, तिला असला भलता चावटपणा करावयाची सवयच! मग तिनें तो केला तर काय नवल आहे?

**मदयंतिका**—सखे, मालतीस असें उगीच नांव ठेवूं नको!

**बुद्धरक्षिता**—सखे, विश्वासभंग करणार नाहीं ह्मणून जर तूं वचन देत असलीस, तर तुला कांहीं गुप्त गोष्ट सांगेन!

**मदयंतिका**—सखे, मीं तुझ्या सांगण्याबाहेर कधीं गेलें आहें का, आज माझ्यापासून असें वचन मागतेस तीं? बुद्धरक्षिते, तूं आणि ही लवंगिका दोघी मला केवळ माझ्या हृदयासारख्याच आहांत, असें मी समजतें. सांग काय सांगणार तें, मनांत कसलाच किंतु बाळगूं नकोस!

**बुद्धरक्षिता**—यावेळीं तुझा तो हृदयवल्लभ मकरंद तुझ्या दृष्टीस पडला, तर तूं काय करशील?

**मद्यंतिका**—काय करीन ? प्रियसखी, त्याच्या प्रत्येक अवयवाकडे सारखी दृष्टि लावून डोळ्यांचें पारणें फेडून घेईन !

**बुद्धरक्षिता**—बरें, पण कामाच्या स्वाधीन होऊन पुरुषोत्तमानें जशी बलात्कारानें रुक्मिणीस आपली सहधर्मिणी केली, तसें त्या पुरुषोत्तम मकरंदानें मदनविकारवश होऊन मन्मथ उत्पन्न करणाऱ्या तुला आपल्या बाहूंनीं घट्ट कवटाळून जबरदस्तीनें आपली नवरी केली, तर तूं काय करशील ?

**मद्यंतिका**—सखे, उगाच कां माझ्या मनाला आशा लावतेस !

**बुद्धरक्षिता**—सखे, पण सांग तर खरी ! नुसतें सांगायाला काय वेंचतें ?

**लवंगिका**—बुद्धरक्षिते, हृदयाच्या वेदनेस सुचविणाऱ्या मोठ्या उसाशावरून तुला कळत नाहीं का ? वेड्यासारखें तिच्या तोंडानेंच कशाला वदवतेस ?

**मद्यंतिका**—सखे, त्या महाभागानें आपला प्राण धोक्यांत घालून त्या दुष्ट व्याघ्रापासून जिंकून घेतलेल्या ह्या शरीराची मालकी आतां मजकडे काय राहिली आहे ? आपल्या मालाचें काय पाहिजे तें करण्यास तो मुकत्यार आहे!

**लवंगिका**—शाबास ! मोठेपणाला शोभेल असेंच बोललीस !

**बुद्धरक्षिता**—पण सखे, ह्या भाषणाचें पक्कें स्मरण ठेव हो ! नाहीं तर मग फिरशील पहा ?

**मद्यंतिका**—अग बाई, मध्यरात्रीचा चौघडा वाजूं लागला, तर आतां मी जातें, आणि दादाला खूब रागें भरून व त्याचें आर्जव करून, मालतीवर त्याची मर्जी बसेलसें करितें. ( उठूं लागते. )

( इतक्यांत मकरंद तोंडावरचें पांघरूण
काढून मदयंतिकेचा हात धरितो. )

**मद्यंतिका**—सखे मालती, जागी झालीस ? ( पाहून हर्षानें आणि भयानें गोंधळून ) अहो, येथें दुसरेंच कोणी तरी आहे !

**मकरंद**—

**रंभोरु ! सोडिं भय, कंप तुझ्या स्तनांला**
**हा सूटला, कुचभराक्षम मध्य झाला;**
**ज्या चिंतुनी हृदयिं तूं कंवटाळिशी, तो**
**त्वद्दास हा, सखि ! तुझ्या विरहास भीतो. १**

**बुद्धरक्षिता**—( मदयंतिकेची हनुवटी उचलून ) सखे,

**करुनि मनोरथ सहस्र, वरिला जो प्रियकर, तो पाहीं**
**रात्र अंधारी, गृहांत सखये! कोणिहि जागें नाहीं! १**
**टाकीं काढुनि पायींचे हे पैंजण,-वाजति भारी,**
**कृतज्ञतेतें स्मरुनि मनीं; चल, जाऊं निघोनि सारीं. २**

**मदयंतिका**—सखे, चल ह्मणतेस खरी, पण आपण जावयाचें कोठें?

**बुद्धरक्षिता**—जेथें अगोदरच मालती जाऊन बसली आहे, तेथेंच!

**मदयंतिका**—काय! मालती निघून गेली? तिनेंदेखील असलें साहस केलें!

**बुद्धरक्षिता**—तर काय अझून बसली आहे? आणि सखे, 'ह्या जिंकून घेतलेल्या शरीराची मालकी आतां मजकडे काय राहिली आहे? आपल्या मालाचें काय पाहिजे तें करण्याला तो मुक्त्यार आहे!' इत्यादि तूं नुकतेंच भाषण करून आपलें शरीर या महाभागाला आधींच अर्पण करून चुकली आहेस, त्याचें स्मरण आहेना! ( मदयंतिका डोळ्यांत पाणी आणते. )

**बुद्धरक्षिता**—( मकरंदाला ) हे महाभाग्यवंता मकरंदा, माझ्या प्रिय सखीनें तुला आपला आत्मा वाहिला!

**मकरंद**—

**सांगूं काय, कृतार्थ आज गमतो हा जन्म मातें, भला**
**माझा यौवनवृक्ष हा फलभरें अत्यंत कीं वांकला;**
**दैवें आणि मनोभवें दिलि कृपा दावोनियां ही मला**
**लावण्यैककला, कुलांत कमला[1], माझ्या न भाग्या तुला[2]. १**

तर मग ह्या चोरदारानें निघून जाऊन आपलें कार्य साधूं. ( सर्व हळूच इकडे तिकडे फिरतात. ) काय हो, मध्यरात्रीं कोणी फिरेनासें झालें ह्मणजे रस्त्यांस काय ही एका तऱ्हेची शोभा येते!

**प्रासादांच्या गवाक्षांमधुनि पवन हा वाहतो, गंध ज्यास**
**मद्याचा येतसे हा मधुर मधुरसा ज्यांत कर्पूरवास;**
**तेणें वाटे विलासी तरुण निवहे[3] कीं नूतनां कामिनींतें**
**घेवोनीयां अनंगोत्सव करुनियां घालवी यामिनीतें. १**

[ सर्व जातात.

**[ नन्दनविप्रलम्भनामा सप्तम अंक समाप्त. ]**

---

१ लक्ष्मी. २ तुलना. ३ समुदाय.

# अंक ८ वा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—कामंदकीचा आश्रम. अवलोकिता प्रवेश करिते. ]

**अवलोकिता**—( स्वगत ) भगवती कामंदकी नंदनाच्या वाड्यांतून नुक्तीच माघारी आली व मीं तिचें पादवंदनहि केलें. आतां मालती आणि माधव ह्यांच्याकडे जावें. (कांहीं पुढें जाऊन पाहून) तीं पहा, या उष्णकाळाच्या दिवसांत अंगाची तलखी होत असल्यामुळें उभयतां त्या समोरच्या पुष्करणींत यथेच्छ जलक्रीडा करून पायऱ्यांवर वसलीं आहेत, तर तिकडेच जाऊं.

[ जाते.



## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—कामंदकीच्या आश्रमांतील पुष्करणी. कांठावर मालती व माधव वसलीं आहेत, असा प्रवेश. ]

**माधव**—( स्वगत आनंदानें ) मदनाचा प्रिय मित्र असा हा जो रात्रीचा मध्यसमय, त्याची किती तरी शोभा दिसत आहे पहा !

**उदय नाहीं पावला चंद्रमा तों,**
**मातलेला बहु अंधकार जातो**
**लया, किरणीं त्याचिया कसा पाहें;**
**मंद मंदहि केतकी गंध वाहे. १**

ह्या करनकऱ्या मालतीचा हट्ट घालवून हिला कसें वळवावें बरें? होय, आतां असें करून पाहूं. ( उघड ) सखे मालती, नुकतें शीतल जलानें स्नान केल्यामुळें तुझें अंग कसें गार आणि तापहारक झालें आहे. अशा वेळीं माझ्या देहाचा ताप दूर कर ह्मणून मी तुझी एकसारखी विनवणी करित असतां अझून तूं परकेपणा बाळगून माझी प्रार्थना कां बरें मान्य करित नाहींस? प्राणसखे !

**केशांपासुनि तोयबिंदु गळती मुक्ताफळांचे परी**
**जों, उत्तुंगकुचद्वयांतर असे ओलें जलें जोंवरी,**
**आंगीं जोंवरि दाटला बहुतसा रोमांच, पद्मानने !**
**देईं तोंवरि एकवार मजला आलिंगन प्रीतिनें. १**

**प्रेमें जीवरि घर्मबिंदु उठती, उज्जीवना जी करी,**
**ओली चंद्रकरींच चंद्रमणिंची मालाच जी साजरी,**
**ऐशी नाजुक ती, सखे! भुज तुझी, घालीं गळां माझिया,**
**तेणें मी अति धन्य होइन खरा साऱ्या जगामाजि या! २**

अथवा, आलिंगन दूर राहिलें, निदान सुखानें दोन शब्द तरी बोल! काय, हा माधव संभाषणाला देखील योग्य नाहीं? प्रिये, अशी निष्ठुर कां बरें होतेस?

**मलयमारुतें शशिकिरणांनीं दग्धा या अंगाला**
**आलिंगुनियां शांत न करिशी, लावीं बोल न तुजला. १**
**कोकिलशब्दश्रवणें झाली बहुत व्यथा कानांस,**
**वारीं ती तरि निजवचनामृत सत्वर पाजुनि त्यांस. २**

**अवलोकिता**—(प्रवेश करून मालतीजवळ जाऊन) अग करनकरे मालती, माधव क्षणभर डोळ्यांआड झाला असतां, "अगबाई, आर्यपुत्राला जाऊन किती तरी वेळ झाला! पुनः तो मला डोळे भरून पहावयास केव्हां मिळेल? आतां भेटला ह्मणजे मी सर्व भीति आणि लज्जा सोडून डोळे भरून त्याला पाहून घेईन; आतां तो पुनः भेटतांच 'आर्यपुत्रा, तूं फार वेळ भेटला नाहींस ह्मणून आतां तुला दुप्पट आवळून आलिंगन करितें' असें त्याला ह्मणेन व कुठें कुठें ह्मणून जाऊं देणार नाहीं!" अशी तूं माझ्याजवळ वरचेवर उत्कंठेनें ह्मणत होतीस, तीच तूं आतां अशी मुकी कशी झालीस? एवढा वेळ तो प्रार्थना करित आहे तर त्याच्याकडे नुसतें पाहातदेखील नाहींस! मला बाई याचें मोठें नवल वाटतें!

( मालती रागावल्यासारखें करून अवलोकितेकडे पाहते. )

**माधव**—( स्वगत ) शाबास! भगवतीच्या ह्या पट्टशिष्यिणीचें काय हें चातुर्य आणि भाषण तरी किती गोड आणि मार्मिक! ( उघड ) प्रिये, मालती, अवलोकिता सांगते हें खरें का? (मालती डोकें हालवून खरें नाहीं असें सुचविते.) तुला माझ्या गळ्याची शपथ आहे, आणि त्या लवंगिका आणि अवलोकिता ह्यांचीहि पण शपथ आहे, काय तें तोंडानें बोलून स्पष्ट सांग. तुझ्या ह्या खाणाखुणा कांहीं बुवा आपल्याला कळत नाहींत!

**मालती**—( लाजल्यासारखें करून ) मला नाहीं मेलें कांहीं ठाऊक!

**माधव**—( स्वगत ) अहाहा! अस्पष्ट असले तरी किती गोड हे शब्द! ( मालतीकडे पाहून ) पण अवलोकिते, हें काय?

**प्रियाकपोल अश्रुंनीं धुऊनि लक्ख जाहला,**
**सवेंच त्यांत इंदुचा मयूख एक बिंबला;**
**तिच्या मुखप्रभामृता पियावयास इच्छुनी,**
**तया मृगांक शोषितो गमे नळीच लावुनी !** १

**अवलोकिता**—सखे, असल्या आनंदाच्या प्रसंगीं तूं अशी स्फुंदस्फुंदून कां ग रडतेस ?

**मालती**—( अवलोकितेस ) सखे, प्रियसखी लवंगिकेला जाऊन किती तरी वेळ झाला, ती येणार तरी केव्हां बाई ? तिची बातमीदेखील कळत नाहीं !

**माधव**—अवलोकिते, प्राणप्रिया काय ह्मणते ?

**अवलोकिता**— इच्या रडण्याचें कारण तूंच आहेस ! इची प्रियसखी लवंगिका बराच वेळ झाला तरी आली नाहीं, नि त्यांतून तूं तिचें नांव घेऊन इला तिच्या गळ्याची शपथ घातलीस, तेव्हां तिची आठवण होऊन ही रडत आहे, दुसरें कांहीं नाहीं.

**माधव**—मी आतांच कलहंसकास नंदनाच्या घरीं पाठवून गुप्तपणानें तेथील वर्तमान काय आहे, त्याची बातमी घेऊन येण्यास सांगितलें आहे. ( उत्कंठापूर्वक ) अवलोकिते, बुद्धरक्षितेचा मदयंतिकेविषयींचा प्रयत्न सफळ होईलना ? तुला कसें वाटतें ?

**अवलोकिता**—याबद्दल तुला संशय कां वाटतो ? हे महाभागा, पण मला खरेंच सांग, मकरंद वाघाच्या नखप्रहारांनीं मूर्च्छित झाला असतां तो सावध झाल्याचें वर्तमान तुला मालतीनें सांगितलें, तेव्हां तूं मालतीला आपलें अंतःकरण व प्राण बक्षीस दिले. आतां मकरंदास मदयंतिका मिळाली हें वर्तमान तुला जर कोणी सांगेल, तर त्याला तूं काय बरें बक्षीस देशील ?

**माधव**—( स्वगत ) इनें मला जें पुसावयाचें तेंच पुसलें ! ( उघड ) मदनोद्यानास अलंकारभूत अशा बकुलवृक्षाच्या पुष्पांची मीं कशी तरी गुंफिलेली, आणि मालतीचें प्रथम दर्शन होऊन माझें तिजवर तत्काळ प्रेम जडलें त्याची साक्षीभूत अशी ही ( हृदयास हात लावून ) माझ्या गळ्यांतील बकुलमाला बक्षीस देईन. जी ही माळ—

**मीं गुंफियली असें सांगुनी, प्रेमें सखीजनानें**
**दिधली हस्तीं तिच्या; तयेनें स्तनांवरी सन्मानें** १

**धरिली; विवाहसमयीं निराश होउनि ती ही मातें**
**अर्पियली, मज लवंगिकासें समजुनि अपुल्या हातें ! २**

**अवलोकिता**—सखे मालती, ही बकुलपुष्पांची माळ तुझी फार आवडती आहे, तर इच्याविषयीं तूं फार सावध ऐस हो! नाहीं तर पहा ही कदाचित् दुसऱ्याच्या हातीं जाईल !

**मालती**—प्रियसखी, कशी अगदीं माझ्या मनची गोष्ट बोललीस !

**अवलोकिता**—हां, कोणाचा तरी पाय वाजल्यासारखें ऐकूं येतें !

**माधव**—( समोर पाहून ) अरे, कलहंस आला !

**मालती**—मकरंदास मदयंतिकेचा लाभ झाला, ही आनंदाची गोष्ट आपणास मीं सांगितली आहे वरें !

**माधव**—( हर्षानें मालतीस आलिंगून ) आमची इष्टसिद्धि झाली ! ( गळ्यांतील बकुलपुष्पांची माळ मालतीस देतो. )

**अवलोकिता**—भगवतीनें बुद्धरक्षितेवर मोठीच जोखमाची कामगिरी सोंपविली होती, ती तिनें उत्तम पार पाडली ह्मणावयाचें !

**मालती**—( हर्षानें ) अहाहा ! माझी प्रियसखी लवंगिकाहि आली ! ( सर्व उठतात. )

( इतक्यांत गडबडीनें कलहंस, मदयंतिका,
बुद्धरक्षिता आणि लवंगिका येतात. )

**लवंगिका**—हे महाभागा, रक्षण करा ! अर्ध्या वाटेंत शहराच्या बंदोबस्ताकरितां फिरणाऱ्या शिपायांनीं मकरंदास अडविलें; पण इतक्यांत कलहंसकाची गांठ पडल्यामुळें त्यानें आह्मांला त्याच्याबरोबर इकडे पाठविलें.

**कलहंस**—आह्मी इकडे येत असतां, मागें मारामारीचा मोठा गलबला ऐकिला. त्यावरून असा तर्क होतो कीं, शत्रूला आणखी कुमक येऊन पोहोंचली असावी.

**मालती**—हाय हाय! अवलोकिते, एकदमच हर्ष आणि उद्वेग उत्पन्न करणारा असा हा प्रसंग कसा अवचित प्राप्त झाला ग! आतां करावें तरी काय?

**माधव**—( मदयंतिकेस ) सखे, आलीस, चांगलें झालें. ये ये, आमच्या घरास तुझे पाय लागले, हें मोठें भाग्य ह्मणावयाचें. तुझ्या प्रियाला मार्गांत गस्तवाल्यांनीं अडवल्याचा कांहीं खेद करूं नको. तूं अशी चिंताक्रांत कां

दिसतेस? मकरंद एकटा असून पुष्कळांनीं त्याला घेरलें आहे ह्मणून कीं काय? सखे, तो सर्वांना पुरून उरण्यासारखा पराक्रमी आहे!

**करी युद्धातें तो मृगपति मदोन्मत्त करिशीं,**
**कराघातें फोडी करट, मडकीं पातळ जशीं!**
**तया सिंहा साह्य प्रखर नखरें मात्र असती,**
**प्रतापी संकष्टां निजभुजबळानेंच तरती. १**

तर, आपल्या थोर शौर्यास साजण्यासारखा पराक्रम माझा प्रिय मित्र मकरंद करित आहे. हा पहा, मीहि आतांच जाऊन माझ्या मित्राला साह्य करतों.

**अवलोकिता—**
**लवंगिका—**
**बुद्धरक्षिता—** } जगदंबे! ह्या दोघांहि महाभागांला सुखरूपपणें परत आण.

**मालती**—सखे अवलोकिते, गडे बुद्धरक्षिते, सख्यांनों, लवकर जाऊन ही वातमी भगवती कामंदकीला कळवा हो! प्रियसखी लवंगिके, तूंहि लवकर जाऊन प्राणनाथास सांग कीं, जर आपणास आमची दया येत असेल, तर आपल्या शरीरास जपून पराक्रम करावा.

[ अवलोकिता, बुद्धरक्षिता आणि लवंगिका जातात.

**मालती**—गडे, मदयंतिके! लवंगिकेला परत यावयाला इतका वेळ कां बरें लागला? आतां काय करूं बाई मी! प्रियसखी लवंगिकेची वाट काय झाली, ह्याचा शोध तरी करून येतें. ( इकडे तिकडे फिरते. )

**मदयंतिका**—( भयभीत होऊन ) हें काय? माझा डावा डोळा कां बरें लवतो आहे?

**कपालकुंडला**— ( प्रवेश करून मालतीस) अग पापिणी, उभी रहा! पुढें कोठें चाललीस?

**मालती**—( भयभीत होऊन ) हे प्राणनाथ!

**कपालकुंडला**— ( क्रोधानें ) ओरड, ओरड!

**तुझा जो कैवारी, मुनिजनहत्यारी[1], अधम जो,**
**कुठें आहे पोरी! तव पति, मुलीतें फसवि जो!**
**जशी श्येनी[2] रानीं धरि चिमणितें, तेंवि तुजला**
**धरूनी नेतें मी; रड रड, दया नाहिं मजला! १**

---

१ हत्या करणारा. २ बहिरीससाण्याची मादी.

आतां श्रीपर्वतावर नेऊन ह्या कारटीचे तुकडे करून, हाल हाल करून, इला ठार मारतें.

**मदयंतिका**—मीहि मालतीच्या मागेंच जातें. ( फिरून ) अग प्रियसखी, अग मालती !

**लवंगिका**—( प्रवेश करून ) सखे मदयंतिके, मी लवंगिका आहें.

**मदयंतिका**—सखी, तो महानुभाव तुला भेटला काग ?

**लवंगिका**—नाहीं नाहीं. बागेंतून बाहेर निघतांना मोठा गलबला ऐकून तो मोठ्या वेगानें धांवत धांवत शत्रूच्या सैन्यांत शिरला. तदनंतर निरुपाय होऊन मी परतलें. इकडे परत येत असतां, वाटेनें ' हे महानुभावा माधवा, हा साहसिका मकरंदा, फार वाईट झालें,' असे त्यांचे गुण आठवून हळहळणाऱ्या नगरवासी लोकांचे विलाप घरोघर मीं ऐकिले. आपल्या प्रधानांच्या मुली फसवून नेल्या, हें ऐकून राजासहि मोठा क्रोध येऊन त्यानें पुष्कळ पायदळ पाठवून आपण स्वत: राजमंदिराच्या उंच गच्चीवर उभा राहून तो चंद्राच्या प्रकाशांत लढाई पाहत आहे, असें लोक बोलताहेत.

**मदयंतिका**—हाय हाय ! किती मी मंदभाग्य आहें ही !

**लवंगिका**—सखे, मालती कोठें आहे ?

**मदयंतिका**—ती पहिल्यानेंच तुला पाहावयाला ह्मणून गेली, त्यावर मीं तिला नाहीं पाहिलें. कदाचित् बागेंतल्या दाट झाडींत शिरली असेल तर कोण जाणे !

**लवंगिका**—सखे, चल लवकर, मालतीचा शोध करूं. मालती फार भितरी आहे. ती ह्या प्रसंगीं प्राणत्याग देखील करील. सखे मालती, अग, मालती मालती ह्मणून मी हांका मारतेंना? ओ कां देत नाहींस ? ( इकडे तिकडे फिरतात. )

**कलहंस**—(प्रवेश करून आनंदानें ) फार चांगलें झालें ! आह्मी सर्व युद्धापासून सुरक्षित आलों. काय तें आश्चर्य ? तें शत्रूचें सैन्य अद्यापि माझ्या डोळ्यांपुढें दिसतें आहे ! ज्या सैन्यांत वर उचललेल्या दाट तरवारींवर चंद्राचे किरण पडून त्या तरवारी लकाकत आहेत, व त्यामुळें मदोन्मत्त वळरामानें आपल्या प्रचंड भुजदंडानें नांगर टाकून ओढिल्यामुळें इतस्तत: जिच्या लाटा खळबळून गेल्या आहेत, अशा यमुनेच्या प्रवाहाची शोभा ज्या सैन्याला आली आहे; तसेंच, ज्या सैन्यांत महापराक्रमी मकरंद शिरून मोठ्या आवेशानें व निर्दयपणें शस्त्रप्रहार करित असतां, शत्रुपक्षाचे योद्धे

चोहोंकडे भडकून गेले आहेत, व त्यांची मोठी ओरड होऊन तिनें आकाश आणि पृथ्वी दणाणून गेली आहे; तसेंच माधवानें आपल्या भुजवज्रानें प्रहार केल्यामुळें मोठमोठे योद्धे जर्जर झाले असतां, त्यांच्या हातांतील आयुधें हिरावून घेऊन त्याच आयुधांनीं जेव्हां तो शत्रुसैन्यास झोडपित सुटला, तेव्हां सर्व शिपाई पळून जाऊन रस्त्यांत कोणी नाहींसें झालें; माधव मात्र एकटा तेथें राहिला, इत्यादि गोष्टी आत्तां घडताहेतसें वाटतें! आणि राजाची गुणग्राहिता तरी केवढी पहा! ह्या दोघां वीरांचा अद्भुत पराक्रम गच्चीवरून पाहून राजाला फार आनंद झाला. नंतर त्यानें आपला चोपदार तत्काळ पाठवून मारामारी बंद करविली, आणि माधव आणि मकरंद ह्यांनां जवळ बोलावून नेलें. मग मजपासून ते दोघे कोणाचे कोण वगैरे सर्व मजकूर समजून घेऊन, उभयतांच्या मुखचंद्राकडे वारंवार पाहून तो प्रसन्न झाला; आणि त्यांचें मोठें गौरव करून त्यांनां बक्षिसें दिलीं; आणि नंदन आणि भूरिवसू ह्यांचीं मुखें रागानें लाल झालीं होतीं, त्यांनां मधुर भाषणानें सांत्वन करून ह्मणाला कीं, 'प्रधानजी! सर्व भुवनास भूषणभूत, कुलीन, पराक्रमी, गुणवंत आणि नवचंद्राप्रमाणें नेत्रास आनंदकारक, असे हे दोघे जांवई तुह्मांला मिळाल्यानें तुह्मांला मोठा संतोष व्हावा असें आह्माला वाटतें.' असें बोलून राजा अंतःपुरांत गेला. आतां माधव आणि मकरंद दोघे इकडेसच येत आहेत. हें वर्तमान भगवती कामंदकीस जाऊन सांगतों.

[ जातो.

( तदनंतर माधव आणि मकरंद येतात. )

**मकरंद**—केवढा हो लोकोत्तर माझ्या मित्राचा पराक्रम हा! पहा—

**तुटुनी शत्रूंवरी पडून, करितां वज्रमुष्टींनीं ताडण,**
**शरीराचें चूर्ण होऊन, हाडें मोडती कडकडा. १**
**त्यांचींच शस्त्रें घेऊन, युद्ध करितां अति दारुण,**
**पायदळें गेलीं दुभागून, वाट जाहली मधोनियां. २**

**माधव**—ती गोष्ट पाहून मनांत वैराग्य उत्पन्न होतें.

**चंद्राच्या किरणांत घेउनि सवें पद्मानना बैसले,**
**त्यांनीं प्राशित मद्य सेवुनि, सुखा अत्यंत जे पावले,**
**आतां त्वद्भुजभग्नगात्र अरि ते होऊनि गेले पहा;**
**संसाऱ्यांस अशापरीच घडती, हा हर्ष! संताप हा! १**

पण सख्या मकरंदा, राजा तरी केवढा कृपाळू आणि सज्जन आहे! त्याचें थोरपण सर्वकाळ आठवण्यासारखें आहे. पहा, आह्मी अपराधी असतांहि, निरपराध्या-प्रमाणें ज्यानें आह्मांवर प्रसाद केला.

**मकरंद**—बरें चल, आतां कलहंस मालतीस आणि मदयंतिकेस रणवृत्तांत सांगत असेल, तो ऐकूं. आणखी,

**ऐकत असतां तुझ्या मुखांतुनि उत्तम युद्धकथेतें,**
**हंसुनि विनोदें गालीं मालति पाहिल मदयंतीतें! १**
**तेव्हां मम सखि लज्जित होउनि खालीं घालिल मान,**
**जशी कमलिनी कमल लवविते, भासल तिशीं समान! २**

चल तर, आपण त्या समोरच्या बागेंत जाऊं.

**माधव**—( बागेंत येऊन ) येथें तर कोणीच दिसत नाहीं!

**मकरंद**—मित्रा, आपण दोघेहि फार वेळ परत आलों नसल्यामुळें त्या चिंताक्रांत होऊन चैन पडत नसल्यामुळें येथेंच कोठें तरी ह्या झाडींत फिरून वेळ घालवित असतील. चल तर आपण तिकडेच पाहूं. (इकडे तिकडे फिरतात.)

**लवंगिका**—(मदयंतिकेस) सखे, ही मालती येत आहे पहा. ( अकस्मात् पाहून ) दैवयोगानें हे महानुभाव पुनरपि दृष्टीस पडले!

**मकरंद—**
**माधव—** } लवंगिके, मदयंतिके, मालती कोठें आहे?

**दोघी**—कुठली मालती, आह्मी तिलाच सोधतों आहों! इतक्यांत तुमचे पाय वाजल्यावरून आह्मांला तिचा भास झाला, ह्मणून आह्मीं तिला हांक मारली.

**माधव**—अग, काय तें खरें सांगा! माझें हृदय कंपायमान झालें आहे. जीव कासाविस होत आहे. प्रियसखी दृष्टीस न पडल्यामुळें मला कांहींएक सुचेनासें झालें आहे. तर ती कोठें आहे, तें स्पष्ट सांगा.

**कमलाक्षीला मोठें कांहीं घडलें काय अरिष्ट!**
**शंका वारंवार अशी मज येउनि, होती कष्ट. १**
**तळमळतो जिव, चैन पडेना, लवतो डोळा डावा,**
**वचनहि तुमचें ऐसें; वाटे, झाला घात असावा! २**

**मदयंतिका**—हे महानुभावा! आपण येथून गेल्यानंतर बुद्धरक्षिता आणि अवलोकिता ह्या दोघींनां मालतीनें कामंदकी आईस हें लढाईचें वर्तमान

कळविण्याकरितां ह्मणून पाठविल्या, आणि 'आर्यपुत्रास सावधपणानें युद्ध करावयास सांग' असा निरोप देऊन लवंगिकेला आपल्याकडे पाठविलें. लवंगिकेला आपल्याकडे जाऊन बराच वेळ झाल्यामुळें तिला परत यावयास झालेला अवधि सहन न होऊन उतावीळ होऊन मालती तिला पाहण्याकरतां बागेच्या दरवाज्याकडे गेली; मग तिच्या मागोमाग मीहि गेलें; पण ती कोठेंहि दृष्टीस पडेनाशी झाली. तिला आह्मी सोधित आहों– इतक्यांत तुह्मी दोघे आमच्या दृष्टीस पडलां.

**माधव**—हा प्रिये मालती ! सखे, कोठें ग गेलीस ?

**जाणों काय तुला अपाय घडला, शंका अशी येउनी**
**माझें व्याकुल होतसे मन; विनोदातें अतां सांडुनी**
**दे प्रत्युत्तर, हार मानित असें, निष्ठूर ऐशी अहा !**
**होशी कां ? विरहें तुझ्या जळतसें, पाहूं नको अंत हा ! १**

**दोघी**—हा प्रियसखी ! तूं अशी निर्दय कशी ग झालीस ?

**मकरंद**—मित्रा, पुरतेपणीं शोध केल्यावांचून उगाच शोक कां करितोस ?

**माधव**—मित्रा ! मालती माझ्याविषयीं किती काळजी वाहते, व कनवाळूपणानें किती दुःख भोगते, तें तुला विदित नाहीं काय रे ?

**मकरंद**—मला तें सर्व विदित आहे; परंतु मालती कदाचित् भगवती कामदंकीकडे गेली असेल, तर आपण तिकडे शोध करूं.

**दोघी**—हो, कदाचित् असेंहि असेल.

**माधव**—ईश्वरकृपेनें असें होवो. ( सर्व इकडे तिकडे फिरतात. )

**मकरंद**—( स्वगत )

**कामंदकीगृहिंच गेलि असेल काय ?**
**भेटेल कीं पुनरपीहि सखी सकाय ?**
**विद्युल्लतेपरिस चंचल बंधुसख्य**
**देई जनास,–जगिं या,–क्षणमात्र सौख्य ! १**

[ सर्व जातात.

**[ आठवा अंक समाप्त. ]**

# अंक ९ वा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—आकाशमार्ग. सौदामिनी प्रवेश करिते. ]

**सौदामिनी**—श्रीपर्वतावरून सध्या मी या पद्मावती नगरींत येऊन तर पोहोंचलें. आतां माधवाचा शोध करूं. बिचारा माधव मालतीच्या विरहानें व्याकुळ झाला असून, जेथें मालतीसहवर्तमान त्यानें सुखाचे दिवस घालविले त्या प्रदेशांचें दर्शन सहन होईना ह्मणून आपला जिवलग मित्र मकरंद याच्यासहवर्तमान पर्वताच्या गुहांतून फिरत असल्याचें ऐकिलें आहे. पहा, योगसामर्थ्यानें मी असें उड्डान साधून आलें कीं, तेणेंकरून सर्व गांवें, नगरें, नद्या, अरण्यें माझ्या दृष्टीस पडलीं. ( मागें पाहून ) अहाहा ! काय ही मौज ! आणखी,

**पद्मावती हें नगर विख्यात, जेथें प्रासाद गोपुरें बहुत,**
**देवमंदिरें असंख्यात, जिकडे तिकडे शोभती. १**
**तयांचीं शिखरें भेदूनि गगन, वरतीं गेलीं, तेणेंकरून,**
**तारामंडळ कोसळून भूमीवरी पडलें कीं ! २**
**ऐशी भ्रांती होते सकळां, पाहूनि रात्रीं नदीजळा,**
**जी वाहते अति विशाळा, परिघामाजी नगरीच्या. ३**

**नगरीसमीप लवणा नामक दिसते नदी सुशीतजला,**
**संध्यावायू सुटतां, लाटा येती सुरेख बहु हिजला. १**
**वर्षाकाळीं उगवे कोमल बहु तृण इच्या तटावरती,**
**तेथें क्रीडति युवजन, सगर्भ धेनू सुखें बहुत चरती. २**

( दुसरीकडे पाहून ) अहाहा ! हा सिंधु नदीचा प्रवाह पर्वताच्या कड्यावरून केवढ्या जोरानें खालीं पडत आहे ! याच्यायोगानें पृथ्वी फुटून जाईलसें वाटतें !

**जेथें ध्वनी तुमुल होत असे अखंड,**
**गंभीर तोयधिरवापरि जो प्रचंड,**
**भोंतालच्या गिरिगुहांत घुमोनि भारी**
**होई गजास्य[1]घनकंठरवानुकारी. १**

---

१ गणपति.

ह्या अरण्यांत चंदन, अश्वकर्ण, सरल, पाटल, इत्यादि असंख्य वृक्षराजांनीं गर्दी केली आहे. तसेंच, येथें माळुर वृक्षांचीं फळें पिकून त्यांचा सुगंध सर्वत्र पसरला आहे. हीं अरण्यें पाहून, जांभळी, कदंब आदिकरून वृक्षांनीं घनदाट असलेल्या ज्या अरण्यप्रदेशांत सूर्यकिरणांचा प्रवेशहि होत नाहीं, व तसल्या किर्र झाडींतून गोदावरीचा प्रवाह वेगानें चालला असून त्याच्या नादानें शेजारच्या पर्वतांच्या गुहा दणाणून जात आहेत, अशा त्या दक्षिणेंतल्या दंडकारण्य-प्रदेशाची आठवण होते. येथें ह्या मधुमती आणि सिंधु ह्या नद्यांचा संगम झाला आहे. ह्या पवित्र स्थळीं सुवर्णबिंदु नामक शिवलिंग आहे. ( नमस्कार करून )

**जय देव, भुवनपालका ! जय, सकलनिगमाच्या धारका !**
**चंद्रशेखरा ! मदनांतका ! जय देवा, जगद्गुरो ! १**

( देवाच्या जवळ गेलेंसें करून )

**आलिंगी मेघमाला ह्मणुनि अति निळा जो दिसे, उंच शृंगें**
**ज्याचीं भेदोनि गेलीं गगन, शिखिकुलें मत्त हर्षप्रसंगें**
**केका शब्दास जेथें करिति, तरुवरी बांधिती पक्षि कोटीं,**
**ऐशा या पर्वतातें बघुनि बहु मला वाटतो हर्ष पोटीं. १**

आणखी, हा चमत्कार पहा—

**पर्वतगुहांत तरुण प्रोन्मद[1] भल्लूक[2] गर्जना करिती**
**ज्या, त्या प्रतिध्वनींनीं मिश्रित होतांच, दशदिशा भरती. १**
**हत्तींनीं निजमस्तें[3] सल्लकिचे[4] घांशितां महास्कंध[5];**
**त्यांच्या तीक्ष्ण रसांचा भरला रानांत उग्र हा गंध. २**

( वर पाहून ) काय, दोन प्रहर झाले ! पहा, ह्या वेळेस कशी मौज आहे ती !

**काश्मीरीवरोनी[6] कोयष्टिकपक्षी[7], पालवलेल्या कृतमालवृक्षीं[8],**
**येवोनियां आपणातें रक्षी, सूर्यतापापासोनियां. १**
**अश्मंताच्या[9] शेंगा खाउन, तेणें फार तृषाक्रांत होउन,**
**पूर्णिक[10] करावया जलपान, वेगें धांवती नदीकडे. २**

---

१ मत्त. २ अस्वल. ३ गंडस्थळानें. ४ साळई झाडाचे. ५ मोठ्या फांद्या. ६ शेरणीचे झाडावरून. ७ कोंढापक्षी. ८ बहाव्याचे झाडावर. ९ आपट्याच्या. १० पक्षि-विशेष.

ज्यास कोठारें बहु असती, त्या स्तिनिशवृक्षाच्या[1] स्कंधावरती,
दात्यूहपक्षी[2] दडोनि बसती, सारे एकत्र जमूनियां. ३
निबिडवल्लींच्या जाळींत, कपोतपक्षी[3] करिती कूजितं[4],
कुक्कुटपक्षी[5] अधःस्थित, तत्तुल्य शब्द करिताती. ४

असो. आतां माधव आणि मकरंद ह्यांचा शोध करून त्यांचें सांत्वन करावें.

[ जाते.

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—कामंदकीच्या आश्रमाजवळील बाग. माधव आणि मकरंद बोलत बोलत प्रवेश करितात. ]

**मकरंद**—( दीनपणें उसासा टाकून )

काय झाली नच कळे वाट तीची,
शक्ति कुंठे सर्वथा कल्पनेची;
तर्कजालीं गुंतुनी भ्रांत होई
चित्त, न सुचे त्यापुढें मार्ग कांई. १
तिच्या प्राप्तीची न धरवे दृढाशा;
अह्मां होईना स्पष्टही निराशा;
अशा दुर्दैवें अवस्थेसि आलों,
पशू ऐसे निरुपाय कसे झालों ? २

**माधव**—प्रिये मालती, तूं कोठें आहेस ? कांहींएक कळूं न देतां एकदम कशी नाहींशी झालीस ? अग निर्दये, प्रसन्न हो, आणि एकवार दर्शन दे !

होता माधव जिवाहुनीही जिवलग तुजला फार,
त्याजवरी तूं सखये ! करिसी रोष असा कां घोर ? १
जाणों, मूर्त महोत्सव जो, तो कंकणमंडित हस्त
देउनि, धन्य मला त्वां केलें, विसरसि काय समस्त ? २

गड्या मकरंदा, ह्या जगांत अशा प्रेमाचा लाभ पुनः होणें दुर्लभ आहे !

---

१ तिवस वृक्ष. २ जलकाक. ३ पारवे. ४ शब्द. ५ कोंवडे.

पुष्पाहूनि मृदू अशा अवयवीं तीनें अनंगव्यथा
होई जी अतिदारुणा घडिघडी, ती सोशिली सर्वथा;
प्राणांतें तृणतुल्य मानुनि परित्यागाशि झाली उभी,
सांगूं काय बहु, करास[१] मजला द्यायासही ती न भी[२]! १

आणखी,

विवाहाचे पूर्वीं मजविषयिंची आस सुटली,
जिवींचा आवांका गळुनि जणुं मर्मैचि तुटलीं;
मृगाक्षी जें तेव्हां करुणवचनें बोलुनि, करी
निजप्रेम स्पष्ट, स्मरसि, सखया! तें मजवरी? १

( अत्यंत उद्वेगानें ) अहो, काय सांगावें?

हृदय उलतें शोकें माझें, दुभाग न हो तरी,
विकल करिते काया मूर्छा न जीवित संहरी;
अंतुनि तनुशी भाजी ज्वाळा[३] न भस्म करीतसे,
विधि[४] करि जरी मर्मोच्छेदा, न जीव हरीतसे! १

**मकरंद**—मित्रा माधवा, दैवाप्रमाणें हा सूर्यहि पीडा करूं लागला आहे! तुझ्या शरीराची तर अशी अवस्था झाली आहे; ह्याकरितां ह्या पद्मसरोवराच्या तीरीं आपण दोन घटका बसून विश्रांति घेऊं. येथें—

विकसितनवपद्मां रम्यसद्मां[५] रमेच्या[६],
कुसुमित सहकारां[७] चामरां कीं मधूच्या[८]
हलवुनि, हरि त्यांचा जो जवें गंध सारा,
सजलकण तुला हा तापहां[९] होत वारा. १

( पुष्करणीवर जाऊन बसतात. )

**मकरंद**—( स्वगत ) ह्याचें मन दुसऱ्या गोष्टीकडे लागून क्षणभर याला मालतीच्या विरहाचा विसर पडेल असा प्रयत्न तर करूं. ( उघड ) गड्या माधवा, पहा—

---

१ करास द्यावयास ह्मणजे लग्न करावयास. २ भ्याली नाहीं. ३ शोकाग्नीची ज्वाळा. ४ दैव. ५ गृह. ६ लक्ष्मीच्या. ७ आंब्याचीं झाडें. ८ वसंताच्या. ९ ताप हरण करणारा.

येथें हीं मदकलहंसपक्षवातें[1][2]
कंपातें धरिति सनाल वारिजातें[3];
बाष्पांच्या परिपतनोद्गमांतरीं[4] तीं
पाहीं, जीं अतिच वनास शोभवीती. १

( माधव तें न पाहतां उद्वेगानें उठतो. )

**मकरंद**—( स्वगत ) अरे, हा माझ्या बोलण्याकडे कांहीं लक्ष्य न देतां मिष्टासारखा उठून दुसरीकडे चालला ? ( सुसकारा टाकून उठून ) सख्या धवा, कृपा कर, इकडे पहा—

नद्या वाहती कुंजांतुनि ह्या, जळांस त्यांच्या वास
वेतसपुष्पांचा येतो, हा हर्षप्रद हृदयास. १
उदकावरती जाइजुईचीं पुष्पें जीं हीं पडलीं,
तीराजवळीं जाळ्यांपरि तीं जागोजागीं जमलीं. २
जेथें फुलले कुटजवृक्ष[5] हे असंख्य चोहींभागीं,
अशा गिरीतें धरोनि असती अंबुद[6] जागोजागीं. ३
छतापरी घन दिसती, त्यांच्याखालीं नाचति मोर,
पाहिं पाहिं ही अद्भुत शोभा, दृष्टी देइं समोर. ४

णखी,

कदंबकुसुमें बहू विकसुनी कशीं शोभती
गिरीवरि; नदीतिरीं कनककेतकी फूलती;
दिशा जलदपंक्तिनीं सकल कालिमा पावती,
गमे, सुममिषें, सख्या ! जणुं, वनावली हांसती. १

**माधव**—मित्रा, तूं ज्याचें वर्णन करित आहेस तो प्रदेश माझ्याहि नेत्रांस सत आहे ! पण सख्या, सांप्रत काळीं ह्या अरण्यभूमीची रमणीयता माझ्यानें ळींच पाहवत नाहीं ! असें कां होतें कोण जाणे ? ( डोळ्यांत पाणी आणून ) थवा, दुसरें काय कारण असावयाचें आहे ?

आले मेघाचे वासर[7], येई अंगातें घर्म फार,
क्षणमात्रें जो जाऊनि शरीर अत्यंत सौख्य पावतें. १

१ मत्तकलहंस. २ पंखांच्या वाऱ्यानें. ३ कमलें. ४ अश्रूंची उत्पत्ति आणि पतन ांच्या वेळांत. ५ कुड्याचीं झाडें. ६ मेघ. ७ दिवस.

**पुष्पें आलीं अर्जुनांस[१], तैशींच हीं बकुलांस,**
**त्यांचा लागला जया वास, ऐसा पूर्ववायू वाहतो. २**
**जैसे इंद्रनीलमणी[२], तैशा काळ्या मेघश्रेणी[३],**
**जलधारा वर्षोनि धरणी[४], सुवासित करिती समस्त. ३**

हे प्रिये मालती!

**जेथें कृष्णतमालनील[५] घन[६] हे आले नभःप्रांगणीं[७],**
**ज्या पूर्णा असती प्रवार्तचलिती[८] धारा जलाच्या कणीं,**
**जेथें इंद्रधनू असे उगवलें, होती मयूरध्वनी,**
**ऐशा सांप्रत मी दिशांप्रति कसा पाहूं मदोद्दीपिनी[९]! १**

( पराकाष्ठेची विरहवेदना झालीसें दाखवितो. )

**मकरंद**— (स्वगत) अरेरे! सांप्रतकाळीं माझ्या प्रिय मित्राची दशा फार कठीण झाली आहे! (डोळयांत अश्रु आणून) वज्राप्रमाणें कठीण हृदयाचा मी, याच्याशीं विनोद आरंभून याला अरण्याची शोभा पाहण्यास सांगण्याची दुर्बुद्धि मला कुठून सुचली? (सुस्कारा टाकून) आतां हा आमच्या कसचा हातीं लागतो! आशाच खुंटली ह्मणावयाची! (भयानें) अरेरे, हा तर मूर्च्छित झाला! (आकाशाकडे पाहून) सखे मालती, तूं एवढी निष्ठुर कशी ग झालीस?

**मालती! त्वां हा घात कसा केला?**
**नाडियेलें कीं बापुड्या माधवाला!**
**काय केला अपराध तुझा त्यानें,**
**असें निष्ठुर त्यावरी काय होणें? १**

हर हर! असा अमोलिक मित्र नेऊन मला दैवानें सर्वस्वी नागविलेंसें वाटतें! आतां काय करूं? हा तर सावध होत नाहीं!

**मित्राचें दुःख ऐसें निरखुनि उलतें चित्त, मर्में तुटोनी**
**जाती, शोकाग्नि पेटे, हृदय जळतसे त्यामधीं सांपडोनी;**
**भासे शून्या अरण्यापरि जग अवघें, गाढ मोहांधकार**
**व्यापी चोहींकडोनी, सुचत मज नसे मंदभाग्या विचार! १**

अरेरे! हे महान् कष्ट आतां मी कसे सहन करूं?

---

१ अर्जुन साददयांस. २ नीळरत्नें. ३ मेघमाला. ४ पृथ्वी. ५ तमालवृक्षासारखे काळे. ६ मेघ. ७ आकाशांत. ८ वाऱ्यानें हाललेल्या. ९ काम वाढविणाऱ्या दिशा.

बंधुहृदयकमला रवि, मालतिच्या चंद्र नयनकुमुदांस,
तो भुवनतिलक आजी जातो मकरंदमित्र विलयास ! १

हा मित्रा माधवा !

गात्रास शीतल जसा रस चंदनाचा,
चित्तास हर्ष, नयना शरदिंदु[1] साचा,
होतास; त्या तुज सख्या ! हरुनी, मदीय
सर्वस्व नागवि कृतांत, नसे उपाय ! १

( माधवाच्या अंगास स्पर्श करून )

हे निर्दया ! मजकडे बघ हास्ययुक्त,
क्रूरा ! मशीं वचन बोल, मनीं मदुक्त
आणूनियां, सहचरा अपुल्या गळ्याला
आव्हेरिशी मज कसा ? अतिरम्यशीला ! १

( माधव सावध होतो. )

**मकरंद**—(उसासा टाकून) हा नीलवर्ण नूतन मेघ, जलबिंदूची वृष्टि करून माझ्या मित्रास हुषार करित आहेसें वाटतें ! वाहवा फार चांगलें झालें ! हा सावध देखील झाला ! बा मेघा, तूं हे माझ्यावर मोठे उपकार केले. माझा मित्र सावध झाल्यानें सर्व जगाचा पुनर्जन्म झालासा मला वाटत आहे !

**माधव**—ह्या अरण्यांत माझ्या प्रियेकडे निरोप घेऊन जाणारा असा मला कोण मिळेल ? (चोहोंकडे पाहून) अहाहा ! चांगलें झालें !

जंबूवृक्ष गगनचुंबित, परिपक्वनील फलभरित,
त्यांच्यामधोन नदी वाहत चालली आहे रमणीय. १
ह्या नदीच्या उत्तरेस, मेघ पातला अद्रिशिखरास,
तरुण तमालांच्या पुष्पांस, जो स्वनीलवर्णें लाजवी. २

(उठून आदरानें मेघाकडे अंजली करून)

हे सौम्या जलदा ! तुझें करितसे कीं वीज आलिंगन ?
किंवा चातक येउनी करिति हे अत्यादरें सेवन ?
तूझें वाहन पूर्ववातें[2] तुजला कीं होतसे सौख्यद ?
तैसें इंद्रधनुष्य सुंदर तुला कीं होय लक्ष्मीप्रदें[3] ? १

---

१ शरत्कालिक चंद्र. २ पूर्वेकडील वायु. ३ शोभाप्रद.

आपल्या गर्जनेनें हा मेघ मला होय ह्मणून प्रत्युत्तर देत आहे. गुहांत भरलेला ह्या गर्जनेचा प्रतिध्वनि ऐकून मोर हर्षानें वर माना करून शब्द करताहेत. बरें तर, आतां ह्याची प्रार्थना करितों.

**दैवानें जरि पाहशील फिरतां स्वच्छंद तूं मत्प्रिया,**
**आश्वासूनि तिला निवेदन करीं माझी दशा, हे प्रिया !**
**आशातंतु तिचा न तोडिं कथितां, जो प्राण रक्षीतसे,**
**तूं संताप निवारिशी, ह्मणुनियां मी प्रार्थितों कीं असें. १**

(हर्षानें) कायहो, हा मेघ माझा निरोप घेऊन माझ्या प्रिय सखीकडे जावयास निघाला देखील! तर मग आपणहि दुसरेकडे जावें. (इकडे तिकडे फिरतो.)

**मकरंद**—(त्रासानें) हाय हाय! ह्याला खचीत वेड लागलें. हा ताता, हा माते, हा भगवति, पहा ही माधवाची अवस्था काय झाली ती!

**माधव**—(दोन पावलें टाकून चोहोंकडे पाहून) हर हर! घात झाला!

**लोध्रपुष्पें दाविती तिची कांती,**
**मृगींपाशीं दृष्टिही उमगताती;**
**गजेंद्रांनीं तद्गमन चोरियेलें,**
**अंगकोमल्यहि लतांना मिळालें. १**
**तस्करांनीं या घात हा प्रियेचा**
**करुनि, लुटिला लावण्यकोश साचा;**
**घेतला तो वांटूनि स्पष्ट त्यांहीं,**
**नसे उरली मज यांत भ्रांत कांहीं! २**

(मूर्छित होतो.)

**मकरंद**—(स्वगत)

गीत.

**सर्वां गुणांचें जो घर, मत्प्राणांचा जो आधार,**
**बाल्यापासून ज्याचा फार प्रेमा मजपाशीं. १**
**तया मित्रा क्लेश दारुण, इष्टजनाच्या विरहेंकरून**
**होती, त्यांतें, मना! पाहुन न उलशि कैसें तूं? २**

**माधव**—(सावध होऊन उठून ) ह्या ब्रह्मसृष्टींत एकासारखे एक असे पदार्थ पुष्कळ आहेत ! (मोठ्या स्वरानें ) अहो, पर्वतारण्यवासी हो, हा मी तुम्हांला नमस्कार करून विज्ञापना करितों. कृपा करून माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या.

**सर्वांगें रम्य जीचीं, विमल कुलवधू पाहिली काय कोणीं ?**
**झाली कैशी प्रियेची गति, विदित असे, प्रार्थितों दीनवाणी**
**हे मित्रांनों ! तुम्हांला; वयहि कळवितों गोरटीचें, तदंगीं**
**कामाविर्भाव नाहीं, प्रकट तरि बहू* राहतो अंतरंगीं. १**

**येथें शिखंड उचलुनि मोरें नाचति, कलकेकांनीं[1]**
**सारीं रानें व्यापिति, ते ध्वनि पडती माझ्या कानीं. १**
**तैसा चकोर कामभरानें मत्त होउनी जातो**
**कांतेपाशीं, त्यास पहातां हर्ष तिलाही होतो. २**
**तैसा गोलांगूलहि[2] अपुल्या कांतेच्या गालातें**
**पुष्पपरागें रंगवितो हा, पहा पहा नवलातें ! ३**
**कोणापाशीं मुख पसरूं मी तीच्या वार्तेसाठीं ?**
**जेथें तेथें सर्व लागले अपुल्या कामापाठीं ! ४**

**हा वानर कांतेचें मुख उचलुनि चुंबितो कसा पाहें !**
**यदधरकांती[3] पडतां, दंतांची पंक्ति रंगली आहे. १**

हा हत्ती आपल्या प्रियेच्या खांद्यावर आपली सोंड ठेवून, व चंदनाच्या झाडाच्या फांदीवर मान टेंकून विश्रांति घेत आहे. तर ह्यालाहि प्रियेची वार्ता पुसण्याचा हा समय नाहीं.

**कंडूनें हस्तिनी ही नयन मिटितसे तीजला खाजवीतो**
**हा हत्ती दंतकोटीकरुनि[4], पवनही घालुनी शांतवीतो**
**कर्णाच्या विंझण्यानें, तिज कवल तसे सल्लकीपल्लवातें**
**चावूनी देउनी, हा जणुं, शिकत असे स्त्रीमनोरंजनातें. १**
**हा[5] मेघध्वनि ऐकुनीहि न करी गंभीर कंठध्वनी,**
**शेवाळेंहि सरोवरांतुनि न घे भक्षावया स्वाननीं.**

---

१ मधुर शब्दांनीं. २ वानर. ३ ज्या वानराच्या ओष्ठाची कांति पडून वानरिणीची दंतपंक्ति रंगली. ४ दंताग्रानें. ५ हा गज. * काम हा अध्याहृत कर्ता.

**गेले भृंग उठोनि दान सुकतां, ज्याच्या शिरींचें पहा,**
**झाला कीं करिणीदुरंतविरहें[1] याला महा ताप हा. २**

ह्याला व्यर्थ आयास देऊं नये. आपण पुढें जाऊं. (पाहून) अहो, हा दुसरा एक मदोन्मत हत्ती ह्या सरोवरांत शिरून विहार करित आहे. तारुण्याच्या मदानें हा मोठमोठ्यानें गर्जना करित असतां, ती गर्जना ऐकून ह्याच्या सहवर्तमान संचार करणारी हत्तीण किती आनंद पावत आहे, पहा! कदंबवृक्षाच्या नवीन फुललेल्या फुलांप्रमाणें मधुर, व शीतल सुगंधानें युक्त अशा निरंतर गळणाऱ्या मदोदकाच्या धारांनीं ह्याचें सर्व गंडस्थळ भरून गेलें आहे. ह्यानें आपल्या सोंडेंत कमलिनीचीं पानें, कांदे, फुलें सर्व एकत्र गोळा करून धरलीं आहेत. ह्यानें आपल्या कर्णांच्या प्रहारांनीं जळांतील मोठमोठ्या लाटा फोडल्यामुळें उदकाचे कण चोहोंकडे पसरले आहेत; आणि तेणेंकरून जसें धुकें यावें, तसें सरोवर होऊन हंसादिक जलचर पक्षी गोंधळून गेले आहेत. ह्याच्याशीं आपण संभाषण करूं. हे गजपते, तुझी तारुण्यश्री वर्णावयासारखी आहे. तसेंच तुला स्त्रीचें मनोरंजन कसें करावें, हेंहि समजत आहे.

**श्रांता स्वकांता निरखोनि, सत्वरी**
**करी करानें जलसेक तीवरी,**
**छत्रापरी पुष्करपत्रही धरी,**
**स्नेहें प्रियेचा श्रमखेद तो हरी. १**

**लीलेनें उपडुनि अब्जनालखंडें,**
**दंतांनीं चघळुनि काढितो स्वतुंडें,**
**भक्षाया कवळ तिला करोनि देतो,**
**कांतेचें मन रमवी कसें पहा तो! २**

कायहो! तो उन्मत्त—मला कांहींच उत्तर दिल्यावांचून निघून चालला! हर हर! मी किती वेडा आहें! हा बोलून चालून वनचर पशु, मकरंदासारख्या रसिक मित्राबरोवर बोलण्याजोगीं भाषणें मी याच्याशीं करितों हें काय! हा सख्या, मकरंदा!

---

१ हत्तिणीच्या अत्यंत विरहानें.

**श्वासोच्छ्वास तुझ्याविणें करितसें, धिक्कार मातें असो !**
**धिक् माझ्या रमणीयतेप्रति तुझ्या भावाविणें कां नसो ?**
**धिक् त्यालाहि असो, मला दिवस जो येतो, प्रियाच्या विणें !**
**मित्रावांचुनि अन्य कीं जरि रुचे, धिक् नष्ट माझें जिणें !** १

**मकरंद**—अरेरे, हा माझा सखा माधव विरहव्यथेनें उन्मत्त होऊन देहभानहि विसरला आहे. तरी, ह्याला माझ्या मैत्रीचा संस्कार दृढ असल्यामुळें माझें स्मरण करून मी जवळ नाहींसें समजून हा मला हांक मारित आहे. ( त्याच्यापुढें उभा राहून ) मित्रा माधवा, हा मी मंदभाग्य मकरंद तुझ्याजवळच आहें.

**माधव**—प्रिय मित्रा, पुढें ये, आणि तूं तरी मला कडकडून भेट ! माझी प्रिया मालती आतां मला भेटण्याची तर माझी आशा बहुतेक सुटली! ( मूर्छित होतो. )

**मकरंद**—( स्वगत ) माझ्या जिवलग मित्राच्या मनासारखें करितों. ( त्याला आलिंगून पाहून दयापूर्वक ) हर हर ! माझ्या भेटीची उत्कंठा झाली, इतक्यांतच हा निश्चेतन झाला. आतां कांहीं जिवंत हातीं लागत नाहीं. आतां कांहींच आशा उरली नाहीं ! हा मित्रा,

**प्रेमें चिंताज्वर ज्यास महा, ऐशा या हृदयानें**
**अनिष्ट तुजला घडेल ऐसा धाक वाहिला यानें.** १
**क्षणोक्षणीं मन माझें भारी जेणें दचकत होतें,**
**दुर्दैवानें खरेंच अवघें कैसें झालें, हो, तें !** २

सख्या माधवा, ह्या भयंकर समयापेक्षां गेल्या घटकाच बऱ्या होत्या, असें वाटतें; कारण, विरहानें दुःखित असा तूं तेव्हां जिवंत माझ्या दृष्टीस पडत होतास !

**देह केवळ हा असे मला भार**
**कसा वज्राहुनि जीव हा कठोर !**
**इंद्रियेंही जाहलीं व्यर्थ सारीं**
**दिशा सर्वहि भासती शून्य भारी.** १
**कसा दुःखाचा घोर काळ आला,**
**जगीं एकाकीं अंधकार झाला,**
**सखा माधव सोडुनी मला जातां**
**दशा माझी होईल काय आतां ?** २

हर हर! हे हतभागी मकरंदा! माधवाचें वास्तविक मरण पाहावें ह्मणूनच तूं अद्यापि जिवंत राहिला आहेस काय रे? आतां तुला जिवंत राहून काय करावयाचें आहे? जवळच्या पर्वताच्या ह्याच कड्यावरून खालीं पाटलावती नदींत उडी टाकून माधवाच्या अगोदर परलोकाच्या वाटेस लागावें हेंच आतां योग्य आहे! ( दीनपणानें मागें फिरून पाहून ) हर हर! कायहो हें दुःख! पहा, माझी—

**ज्यातें आलिंगुनि दृढमनस्तृप्ति नाहींच झाली,**
**कांती ज्याची असितकमलातुल्य तीही निमाली,**
**ज्यातें पूर्वी सरस नयनीं पाहिलें मालतीनें,**
**तें हें देतें वपु[1] मज बहु क्लेश ऐशा गतीनें.** १

काय हें आश्चर्य! हा माधव अल्प वयांत केवढा गुणसंपन्न झाला? आणि इतक्यांत ह्याची ही अशी दशा व्हावी काय? मित्रा माधवा, तुझा शेवट असा झाला, कीं—

**येवोनी उदयास पूर्णविधु[2] कीं राहूमुखीं पातला,**
**आला मेघजळें भरोनि, परि तो वातें[3] जसा फांकला,**
**येवोनी फलभार वृक्ष जळला दावाग्निनें, त्यापरी**
**मृत्यूच्या वदनांत तूं गुणनिधे! गेलास कैसा तरी!** १

( चिंतन करून ) हे प्रिय सख्या माधवा! सांप्रत तूं जरी या अवस्थेंत आहेस, तरी तुला मी पुनः एकवार प्रेमालिंगन देतों. कारण, आलिंगन करण्याविषयीं तूं माझी प्रार्थना केली होतीस. तेव्हां मित्राच्या मनांतील शेवटची ही इच्छा कशी मोडावी? (माधवाला आलिंगून) हा मित्रा, हा विमलविद्यानिधे! हा सकलगुणगुरो! तूं मालतीचा केवळ जीवप्राणच होतास! केवढें तरी तुजवर मालतीचें प्रेम! तूं आपल्या अंगकांतीनें मदनाचेंहि सौंदर्य जिंकिलें! तूं बंधुजनरूपसमुद्रास केवळ शरत्काळचा चंद्रच होतास! तुझ्या मुखचंद्रास पाहून माझ्या आणि कामंदकीच्या नेत्रांस अत्यंत आनंद होत असे. हा मित्रा माधवा! ह्या जन्मांत तुझी आणि मकरंदाची ही शेवटची भेट! तुझी अशी अवस्था पाहून हा मकरंद तुझ्या मागें क्षणभर तरी जिवंत राहील असें मनांत सुद्धां आणूं नको.

---

१ शरीर. २ पूर्णचंद्र. ३ वायूनें.

**जन्मापासुन माझ्याविण तूं मातृदुग्धही नाहीं**
**प्यालासी, बा ! मजला सोडुनि कृत्य न केलें कांहीं ! १**
**आतां कैसा एकटाचि तूं तिलोदकाचें पान**
**करिशी ? मित्रा ! उचित नव्हे हें, माझा राखीं मान. २**

( शोक करित माधवास सोडून पर्वताच्या कड्यावर चढून ) ही येथें खालीं पाटलावती नदी आहे. ( शिवाचें स्मरण करून हात जोडून ) हे भगवन् गौरीपते ! माझ्या मित्राचें जेथें जन्म होईल, तेथेंच मला जन्म दे व त्याची माझी निरंतर संगत होईल एवढें मला वरदान दे.

( नदींत उडी घेण्याची तयारी करितो. इतक्यांत सौदामिनी येते. )

**सौदामिनी**—( मकरंदाचें निवारण करून ) वत्सा, असें साहस करूं नको.

**मकरंद**—( सौदामिनीस पाहून ) मातोश्री, आपण कोण आहां ? माझें निवारण कां करितां ?

**सौदामिनी**—मुला, तुझें नांव मकरंद काय ?

**मकरंद**—सोड मला. तोच मी हतभाग्य मकरंद !

**सौदामिनी**—मुला, मी योगिनी आहें. मला मालतीची माहिती आहे. ही पहा मजपाशीं तिची खूण आहे. ( बकुळीच्या फुलांची माळ दाखविते. )

**मकरंद**—( सुसकारा टाकून दीनपणें ) मातोश्री, मालती अद्यापि जिवंत आहे ?

**सौदामिनी**—होय, अगदीं खुशाल आहे. वत्सा, तूं जीव कां देत होतास? माधव खुशाल आहेना ? कोठें आहे तो ?

**मकरंद**—मातोश्री, तो विरहशोकानें मुमूर्षु होऊन पडला हें पाहून माझें धैर्य अगदीं सुटलें. मला त्याच्या वेदना पाहवेनातशा होऊन मी जीव द्यावयास इकडे आलों. आतां आपण हें आनंदाचें वर्तमान सांगितलें, हें फार चांगलें झालें. तर मग लौकर चला; माधवास हें वर्तमान सांगून त्याला सावध करूं ( इकडे तिकडे फिरतात. )

**माधव**—( सावध होऊन ) अरे, मला कोणीं सावध केलें ? हां समजलों ! ह्या मेघमंडळांतून सजल वायु आला, त्यानें मला सावध केलें असावें. परंतु त्यानें हें चांगलें केलें नाहीं? मूर्च्छित पडलों असतां मी प्रियेच्या विरहाचें दुःख अमळ विसरलों होतों, तें मात्र पुन्हा आतां होऊं लागलें.

**मकरंद**—( पाहून आनंदानें ) प्रिय मित्रा, मला तुझी आशा अगदीं राहिली नव्हती; परंतु दैवानें पुन्हा तूं सावध झालास, ही मोठी आनंदाची गोष्ट झाली.

**सौदामिनी**—( अवलोकन करून स्वगत ) मालतीनें सांगितलेल्या खाणाखुणा ह्या दोघांच्या ठायीं बरोबर पटतात.

**माधव**—हे भगवंता, हे पूर्वदिग्गत वायो !

**हे वायो ! सजलांबुदास[1] फिरवीं चोंहींकडे, चातकां**
**तूं आनंदविं, हर्षवीं शिखिकुलां[2], तूं फूलवीं केतकां[3],**
**मूर्च्छेनें विरहव्यथा विसरल्या दुःखी जना दाडुनी**
**जागें रे ! करुनी नफा कवण तो सांगें मला फोडुनी ? १**

**मकरंद**—अहाहा! सर्व प्राणिमात्राचें जीवन करणाऱ्या वायूनें ह्यावेळीं माझ्या मित्रास सावध केलें, हें फार चांगलें केलें.

**माधव**—( आकाशाकडे दृष्टि लावून दोन्ही हातांची अंजली करून ) हे देवा वायो, त्वां मला चेतना दिली, हें नीट केलें नाहीं. उलटें माझ्या दुःखास मात्र कारण झालास ! बरें, जें झालें, तें झालें. आतां तुला इतकीच प्रार्थना करितो कीं—

**वायो ! मज्जीवित तूं, माझी प्रियसुंदरी जिथें आहे,**
**तेथें पुष्परजांशीं सह नेईं; सकृप मजकडे पाहें. १**
**अथवा स्पर्श करोनी तीच्या आंगास होउनी गार,**
**माझ्याकडेस येउनि, कर दुःखाब्धींतुनी मला पार. २**

**सौदामिनी**—( स्वगत ) मालतीनें खूण पटण्याकरितां माधवाला द्यावयासाठीं मजपाशीं दिलेली बकुलपुष्पमाला माधवास दाखविण्याचा हा समय फार चांगला आहे ! ( माधवाच्या ओंजळींत माला अकस्मात् टाकिते. )

**माधव**—(आश्चर्ययुक्त होऊन हर्षानें) कायहो ! मदनोद्यानांतल्या बकुळीचीं फुलें वेंचून मीं आपल्या हातानें जी गुंफली, व कांहीं दिवस माझ्या प्रियतमेच्या उंच स्तनदेशावर जी विहार करित होती, तीच ही माळा ! ( पुरतेपणीं पाहून हर्षानें ) होय तीच ही माळा ! संदेहच नको ! ह्या माळेवर माझीहि एक खूण आहे.

---

१ जलयुक्त मेघास. २ मयूरकुलास. ३ केवडा.

**सरस बकुलपुष्पें गुंफितां, मालतीच्या**
**वदनकमलिं माझी दृष्टि गेली, सतीच्या;**
**ह्मणुनि बिघडली ही एक बाजूस माला,**
**बहुतचि सुख दे ती, पाहतां मन्मनाला. १**

( हर्षानें उन्मत्त होऊन ) प्रिये मालती ! लपून बसलीस काय ? आतां पहा तुला पकडतों ! ( रागावल्यासारखें करून ) अशी माझी अवस्था झाली हें तुझ्या मनांत कांहींच वागत नाहीं ? अग निष्ठुरे !

**जाती प्राण जणों ! फुटे हृदय हें, ऐसें मला वाटतें,**
**अंगेंही जळतीच, काय तम हें चोंहींकडे दाटतें !**
**नाहीं मस्करिचा, सखे ! समय हा, दे दर्शना लौकरी,**
**माया पातळ ही अशी उगिच कां केली स्वदासावरी ? १**

( चोहोंकडे पाहून, हिरमुष्ट होऊन ) हर हर ! येथें कशाची आली आहे मालती ? उगीच मला भास झाला ! ( बकुलमालेस उद्देशून ) अग माझ्या प्रियेच्या सखी, बकुलमाले ! तूं उपकार करणारी आहेस, ह्मणून तुझ्या दर्शनानें मला फार आनंद झाला.

**माले ! तुवां मजवरी उपकार केला,**
**जेव्हां प्रियेस मदनज्वर फार झाला,**
**तेव्हां गळ्यांत तुजलागिं धरोनि, तीनें**
**मत्संगसौख्य गणिलें अपुल्या मतीनें. १**

( दीन मुद्रेनें न्याहाळून पाहून )

**चिंता उल्हास देती, मदनहुतवहा चेतवीतीहि भारी,**
**वृद्धी प्रेमार्णवाची करिति बहुत ज्या, ज्या अति स्नेहकारी;**
**माझ्या आणी तयेच्या किति तरि, सखि ! तूं घातल्या येरझारा**
**कंठीं पूर्वीं; अतां त्या स्मरुनि न खलती माझिया अश्रुधारा ! १**

( माळ हृदयावर ठेवून पुन्हा मूर्च्छित होतो. )

**मकरंद**—( पुढें होऊन वारा घालून ) मित्रा, सावध हो, सावध हो !

**माधव**—( सावध होऊन ) सख्या मकरंदा, अरे, ही माळ माझ्या हातीं आली, हें मालतीचें मूर्तिमंत प्रेमच माझ्या हातीं आलें असें वाटतें ! ही माळ अकस्मात् माझ्या हातांत कोठून आली रे ? तुला कांहीं ठाऊक आहे ?

**मकरंद**—होय. ह्या योगिनीनें ही माळ तुझ्या हातांत टाकिली.

**माधव**—( पुढें पाहून दैन्यपूर्वक हात जोडून ) मातोश्री! मजवर प्रसाद करा, आणि माझी प्रिया खुशाल असल्याचें वर्तमान मला अगोदर सांगा.

**सौदामिनी**—वत्सा, सावध हो, सावध हो. चिंता करूं नको. ती कल्याणी तुझी प्रिया खुशाल आहे. कांहीं काळजी करूं नको.

**माधव**— }
**मकरंद**— } ( सुसकारा टाकून ) मातोश्री, तर मग पहिल्यापासून सर्व वृत्तांत आह्मांला सांगा. आमच्यावर मोठा अनुग्रह होईल.

**सौदामिनी**—ऐका सांगतें. पूर्वीं कराला देवीच्या देवळांत अघोरघंट नामक कोणी उपासक मालतीचा देवीला बळी देत असतां माधवानें त्याचा शिरच्छेद केला—

**माधव**—( उद्वेगानें ) मातोश्री, पुरे पुरे, पुढचा वृत्तांत समजला मला !

**मकरंद**—मित्रा, पुढील वृत्तांत तुला समजला तो कायरे ?

**माधव**—मित्रा, दुसरें काय ? कपालकुंडलेनें आपला सूड उगवला !

**मकरंद**—मातोश्री, माधवाचा तर्क खरा आहे का ?

**सौदामिनी**—होय, वत्सा, माधवानें ताडलेलीच गोष्ट खरी आहे.

**मकरंद**—हर हर ! फार वाईट झालें !

**शरच्छशीची[1] मृदुचंद्रिका जरी,**
**संलग्न झाली कुमुदाकरावरीं[2]**
**हें योग्य आहे, परि दैव हें कसें,**
**अकाळिंचा मेघ वियोग देतसे. १**

**माधव**—हा प्रिये मालती, तुझी अशी दुर्दशा झालीना ? हर हर ! फार वाईट झालें. जेव्हां तूं त्या कपालकुंडलेच्या हातांत सांपडली असशील, तेव्हां उत्पातसूचक धूमलेखेनें ग्रासलेल्या चंद्रकलेसारखी तुझी दशा झाली असेल ! कपालकुंडले, तूं फार अनुचित कर्म केलें !

**मालतीचें संरक्षण तुवां करावें, तें त्यजून,**
**स्वीकारिलें राक्षसपण, हें अत्यंत अनुचित. १**
**सुकुमार पुष्पाची स्थिती, असावी मस्तकावरी ती,**
**तयातें मुसला घातीं, ताडूं नये सर्वथा ! २**

---

१ शरत्कालच्या चंद्राची. २ चंद्रविकासी कमलाच्या समुदायावर.

**सौदामिनी**—वत्सा, शोक करूं नको.

**ती जीव मालतीचा घेती क्रूरा, जरी तिच्याजवळी**
**मी नसतें तरि, बापा ! देती त्या मालतीस करुनि बळी· १**

**माधव**—
**मकरंद**— } ( सौदामिनीस नमस्कार करून ) मातोश्री ! तूं आमच्यावर मोठा प्रसाद केला. ह्या प्रसंगीं आमचे आप्त बंधु, सर्व काय तीं त्र झालीस. पण हें कसें काय झालें, तें सर्व आह्मांला सांग.

**सौदामिनी**—वत्सांनों, हें कसें काय झालें तें सर्व तुह्मांला कळेल. (उठून) आतां मी असें करीन—

**गुरुच्या शुश्रूषेनें[1] संपादित मंत्रतंत्रपर्याप्ता[2]**
**आकर्षणी जगाची विद्या देतें, तुह्मांस मी आतां· १**

[ माधवास बरोबर घेऊन निघून जाते. ]

**मकरंद**—अहो, हें केवढें आश्चर्य ? मोठाच चमत्कार म्हणावयाचा हा !

**तिमिर[3] अणिक विद्युत्तेज हें काय आलें,**
**क्षणभरि नयनांची वृत्ति रोधूनि गेलें !**

पुढें पाहून भयभीत होऊन )

**अवचित न दिसे हा मित्र हें काय आहे ?**

विचार करून ) दुसरें काय असावयाचें ?

**प्रगट करुनि शक्ती योगिनी[4] गुप्त राहे· १**

कांहीं तर्क करून ) हा काय अनर्थ आहे, कांहींच कळत नाहीं. आणखी—

**होतो विस्मय, पूर्ववृत्त घडलें कांहींच कीं नाठवे,**
**हें लोकोत्तर कृत्य देखुनि मनीं भीती नवी सांठवे;**
**होई नष्ट पळांत मोह सगळा, व्यापी पळानें, पहा,**
**हर्षोन्मिश्रित शोक अद्भुत कसा चित्तास होतो, अहा ! १**

र मग आतां ह्या घोर अरण्यांत आमच्या मंडळीसहवर्तमान भगवती ामंदकी गेली आहे, तिला गांठून तिला हा वृत्तांत जाऊन निवेदन करूं.

[ जातो.

**[ नववा अंक समाप्त· ]**

---

१ सेवेनें. २ मंत्रतंत्रांनीं पूर्ण· ३ अंधकार· ४ सौदामिनी.

# अंक १० वा.

## प्रवेश १ ला.

[ **स्थळ**—कामंदकीच्या आश्रमाजवळील अरण्यप्रदेश. कामंदकी, मदयंतिका, आणि लवंगिका प्रवेश करितात. ]

**कामंदकी**—( डोळ्यांत अश्रु आणून ) हा वत्से मालती, बेटा तूं कोठें ग गेलीस? ये लौकर ये, आणि माझ्याशीं बोल.

**प्रतिक्षणीं त्वां बाल्यापासुनि केल्या ज्या ज्या लीला,**
**बोललीस जीं बालभाषणें, आठवती चित्ताला. १**
**त्वद्विरहाचें दुःख होतसे मद्हृदयाला भारी,**
**भेट देउनी मजला, मालति ! मद्दुःखातें वारीं. २**

( आकाशाकडे तोंड करून ) आणखी हे वत्से !

**एका क्षणांत दिसलें रडवें सहास्य[1]**
**जें कन्यके ! सुमुखि ! बाळपणीं त्वदास्य[2];**
**तें आठवे मज अतां, अणि गोड बोल**
**येती मनांत, मज भेट, अणीक बोल. १**

**मदयंतिका—**
**लवंगिका—** }( डोळ्यांत अश्रु आणून आकाशाकडे पाहून ) हा प्रियसखी ! हा चंद्रमुखी! हा सुंदरी! कोठें गेलीस ? शिरसाच्या फुलासारखें नाजूक तुझें शरीर, ती तूं एकटी कोणत्या ग घोर संकटांत सांपडलीस? हर हर! हे भाग्यवंता माधवा ! तुला नुकता कोठें संसारसुखाचा ठेवा सांपडतो आहे, तों इतक्यांत दुष्ट दुर्दैवानें घाला घालून तो तुझ्या हातचा कसा रे हिसकावून नेला !

**कामंदकी**—( अत्यंत खेदानें ) हा वत्सांनों ! काय तुमची ही विपरीत गति झाली !

**जातिलता अणि चंपकपादप[3] यांची जैशी गांठ**
**पडती, तैशी परस्परांची तुमची झाली भेट. १**
**दैवगती ही वावटळीपरि येउनि तुमचा केला**
**वियोग, तीनें तुह्मांवरी हा कसा घातला घाला ! २**

---

१ हास्ययुक्त. २. तुझें मुख. ३ वृक्ष.

**लवंगिका**—हा दुष्टा हृदया! मेल्या, तूं फुटतहि नाहींस! वज्रासरखें कठिण आहेस! (ऊर बडवून खालीं पडते.)

**मदयंतिका**—सखे लवंगिके, स्वस्थ हो, स्वस्थ हो; क्षणभर तरी धैर्य धर. असें काय बरें करतेस?

**लवंगिका**—सखे, मी काय ग करूं आतां? हा माझा प्राण दृढवज्रलेपानं खिळल्यासारखा बसला आहे; मेला शरीरांतून एकदाचा जातहि नाहीं!

**कामंदकी**—वत्से मालती, ही लवंगिका जन्मापासून तुझी आवडती सोबतीण; तुझा वियोग असह्य होऊन ही बिचारी प्राणत्याग करण्यास उद्युक्त झाली असतांहि हिची तुला कशी ग दया येत नाहीं? ही बापडी कशी झाली आहे पहा.

**त्वां उज्ज्वलकांतीनें स्निग्धाही टाकिली, विशोभ[1] असे,**
**जैसी दीपशिखेविण मलिनमुखी वर्तिका[2] न शोभतसे. १**

बाळे, ह्या कामंदकीलाहि टाकून कठोर अंतःकरण करून तूं कशी जातेस? माझे प्रिय मालती, अग लहानपणापासून मीं तुला पोटाशीं धरून वाढविलें, हें सर्व तूं यावेळीं विसरलीस काय?

**त्वां मातृस्तनपान सोडुनि दिल्यापासूनि मीं तूजला**
**स्नेहें वाढविलें, तसें घडिघडि म्यां खेळवीलें तुला;**
**सत्पंथा[3] शिकवूनि, सद्गुणपतीही मेळवूनी दिला!**
**मत्प्रीती[4] धरिलीच मातृसम तूं जाणोनि मद्भक्तिला. १**

(दैन्यपूर्वक) अग चंद्रमुखी! आतां मी अगदीं निराश झालें. माझे सर्व हेतु जागच्या जागीं नाहींसे झाले. अरेरे, मी मनाशीं केवढी उमेद धरिली होती!

**मांडीवरी बसुनियां तुझिया स्तनातें**
**पीई, अशा स्मितमुखा[5] तव बालकातें**
**पाहीन मी! अशि मना बहु आस होती!**
**मी भाग्यहीन! कशि होइल पूर्ण, हो, ती! १**

**लवंगिका**—भगवति, आतां माझ्यानें हे प्राण मुळींच धारण करवत नाहींत! रागावूं नका, मजवर कृपा करा, मी ह्या पर्वताच्या शिखरावरून उडी घेऊन

---

१ शोभाहीन. २ दिव्याची वात. ३ सन्मार्ग. ४. माझ्या प्रेमाला. ५ हास्ययुक्त मुख ज्याचें अशा.

देहपात करून सुखी होतें. तर आपण मला असा आशीर्वाद द्यावा, कीं जेणेंकरून जन्मांतरीं तरी त्या माझ्या प्रियसखीचा मला नित्य सहवास घडावा.

**कामंदकी**—लवंगिके, तूं प्राणत्यागास उद्युक्त झालीस, आणि मला तरी आतां जिवंत राहून काय करावयाचें आहे ? मालतीच्या वियोगाचें दुःख तुला आणि मला सारखेंच आहे ! मालतीवांचून हा जीव मलाहि नकोसा झाला आहे. तर मग तूं आणि मी दोघीहि एकदमच प्राणत्याग करूं. आणखी तुला सांगतें, ऐक—

> **कर्मांच्या भेदानें तीची अमुची न होय जरि भेट,**
> **तत्रापि दुःखशमफळ जीवत्यागें घडेल, हें स्पष्ट.** १

**लवंगिका**—माई, आपली आज्ञा मला मान्य आहे.

**कामंदकी**—( दयार्द्र दृष्टीनें मदयंतिकेकडे पाहून ) वत्से मदयंतिके !

**मदयंतिका**—काय ह्मणतां माई ?

**कामंदकी**—चल, पुढें हो.

**मदयंतिका**—ही पहा, मी तयार आहें. चला.

**लवंगिका**—सखी, कृपा कर, हा प्राणत्यागाचा निश्चय सोडून दे. लवंगिकेची कधींमधीं आठवण करित जा हो !

**मदयंतिका**—( क्रोधयुक्त होऊन ) चल हो एकीकडे ! मी कांहीं तुझी बांधील नाहीं, माझ्या जिवाची मी मालकीण आहें !

**कामंदकी**—( स्वगत ) अरेरे ! ह्या पोरीनेंहि जीव देण्याचा निश्चय केला वाटतें !

**मदयंतिका**—( स्वगत ) नाथा मकरंदा, तुला शेवटचा नमस्कार असो !

**लवंगिका**—भगवति, मधुमती नामक नदीच्या प्रवाहानें ज्याचे कडे पवित्र झाले आहेत, असा हाच तो पर्वत.

**कामंदकी**—बरें तर, आतां विलंब कशाला करितां ?

( सर्वजण कडेलोट करून घेण्यास इच्छितात. इतक्यांत एकदम शब्द होतो 'आश्चर्य आहे, आश्चर्य आहे.' )

> **तिमिर अणिक विद्युत्तेज एकत्र झालें,**
> **क्षणभरि नयनांची वृत्ति रोधूनि गेलें,**

**कामंदकी**—( पुढें पाहून हर्षपूर्वक ) हें काय आहे ?

( आणखी शब्द होतो )

**अवचित न दिसे हा मित्र हें काय आहे ?**

( इतक्यांत बाहेर मकरंद येऊन ) दुसरें काय असावयाचें आहे ?

**प्रकट करुनि शक्ती योगिनी गुप्त राहे. १**

( पुनः शब्द होतो ) 'अहो, हा कोण अनर्थ प्राप्त झाला ?'

**मालतीविनाश समजतां, सर्व विषयावरी विरक्तता,**
**जीविताविषयीं निराशता, धरीतसे हा भूरिवसु. १**
**अग्निकुंडीं पडावयाला, भूरिवसूनें निश्चय केला,**
**तो हा सुवर्णबिंदुतीर्थीं आला, कोण अनर्थ आह्मांवरी. २**

**मदयंतिका**—गडे लवंगिके, मालती आणि माधव ह्यांच्या दर्शनमहोत्सवाचा प्रसंग आणि हें मोठें भय अशा दोन्ही गोष्टी एकदाच प्राप्त झाल्या !

**कामंदकी**— } **मकरंद**— } ( हर्षानें) हर हर ! काय हें संकट, आणि केवढें हें आश्चर्य!

**वाटे चंदनरस अणि अंगीं पडली सुतीक्ष्ण तलवार,**
**किंवा स्फुलिंगमिश्रित पडली अंगावरी सुधाधार ! १**
**किंवा जीवनऔषध विषमिश्रित हें असें गमे मजला,**
**अथवा प्रकाश आणिक तिमिराचा[1] पुंज एकवट झाला. २**
**कां जणुं, शशिकिरणांचा आणि विजेचा मिलाफ करण्यास**
**इच्छा होउन विधिला, सुखदुःख सर्वेंचि देइ, आह्मांस. ३**

( इतक्यांत शब्द होतो ) हां हां, बाबा, हें काय करतां! आपल्या मुखकमलाच्या दर्शनाविषयीं मी अत्यंत उत्कंठित झालें आहें; मला लवकर भेटाहो ! सर्व पृथ्वीवर कीर्ति गाजते आहे, असे आपण मज हतभाग्येकरितां प्राणत्याग करावयास उद्युक्त झालां, हें काय? तुह्मी मजविषयीं इतके कनवाळू असतां, म्यां पापिणीनें तुह्मी निर्दय आहां, असें तुह्मांस लटकें दूषण लाविलें होतें !

**कामंदकी**—वत्से, मरून दुसरा जन्म घेऊन आल्याप्रमाणें आज तुझी पुन्हा भेट झाली, हा मोठा सुदिन समजला पाहिजे. पण चंद्रकळेचें भक्षण करावयास टपलेल्या राहूच्या तोंडांतून ती सुटते न सुटते तोंच तिला ग्रासावयाला जसा

---

१ अंधकाराचा.

केतु उपस्थित होतो, तसा तुझा नाश करावयास हा भूरिवसूचा प्राणत्यागाचा अनर्थ उपस्थित होत आहे !

**लवंगिका**—हा प्रियसखी !

( तदनंतर मूर्च्छित झालेली मालती आणि माधव येतात. )

**माधव**—हर हर ! ही मालती—

**कष्टें प्रवास करुनी स्वजना मिळाली,**
**येथें विपत्ति दुसरीच तयार झाली !**
**जें जें असेल लिहिलें विधिनें कपाळीं;**
**टाळूं शके कवण तें स्वबळें त्रिकाळीं ?** १

**मकरंद**—( अकस्मात् पुढें होऊन माधवास ) मित्रा माधवा, तूं आलास, परंतु ती योगिनी कोठें आहे ?

**माधव**—श्री पर्वतापासून त्या योगिनीसहवर्तमान मी इकडे आलों; येथें पोहोंचतों इतक्यांत अत्यंत दीन स्वर आमच्या कानीं पडला. त्या गडबडींत तिची माझी चुकामूक झाली.

**कामंदकी**— } ( प्रेमपूर्वक आकाशाकडे तोंडें करून ) हे महाभागे,
**मकरंद**— } पुन्हा आमचें रक्षण कर. मातोश्री, गुप्त कां झालीस ?

**मदयंतिका**— } सखी मालती, अग, मी तुला सखी मालती अशी हांक
**लवंगिका**— } मारतेंना; ओ कां देत नाहींस ! भगवति, हिची काय

अवस्था झाली ही तुह्मी तरी पहाहो ! हिचा श्वासोच्छ्वासहि होत नाहीं. हिला वांचवा हो ! हर हर, हे अमात्या ! अग मालती, तुह्मी दोघेंहि परस्परांच्या मरणास कशीं कारण झालां !

**माधव**—हा प्राणप्रिये !

**मकरंद**—हा प्रियसखी !

( सर्व मूर्च्छित होऊन कांहीं वेळानें सावध होतात. )

**कामंदकी**—( वर पाहून ) जशी मेघापासून अकस्मात् वृष्टि व्हावी, तसें हें कसें झालें ?

**माधव**—( श्वासोच्छ्वास टाकून ) अहो, मालती सावध झाली ! पहा—

**घ्राणांतूनि[1] निघे अकुंठित[2] हिच्या निश्वासें[3], तैसा स्तना**
**आलासे सुविकासें[4], सांप्रत हिला आली असे चेतना;**

१ नाकांतून. २ अप्रतिबंध. ३ श्वासोच्छ्वास. ४ टवटवी.

**झाले नेत्र हिचे प्रफुल्लित, मुखीं शोभा हिच्या दीसती,**
**प्रत्यूषीं[1] सरसीरुहावरि[2] जशी शोभा बहु भासती. १**

( इतक्यांत शब्द होतो. )

**पायीं नता नृपतितें अणि नंदनातें**
**आऱ्हेरुनी, स्ववपुतें अनलप्रपातें[3]**
**नाशावयास करि भूरिवसु प्रवृत्ती,**
**केली तयीं सुवच सांगुनि तन्निवृत्ती. १**

**माधव—**
**मकरंद—** ( वर पाहून विस्मयानें ) भगवति, आपण आलां, मोठी दया केली.

**ती योगिनी विभेदुनि मेघांच्या मंडळास येत असे,**
**यद्वचनामृतवृष्टी जलवृष्टीहूनि सुखद होत असे. १**

**कामंदकी—**अहाहा ! आमच्या मनासारखें झालें.

( मालती आदिकरून सर्व बोलतात ) दैवयोगानें आह्मां सर्वांचे प्राण ठिकाणीं आले.

**कामंदकी—**( आनंदयुक्त होऊन डोळ्यांत अश्रु आणून ) ये ये, मुली ये.

**मालती—**भगवति, खुशाल आहांना? (कामंदकीच्या पायांवर मस्तक ठेवते.)

**कामंदकी—**( मालतीस पायांवरून उठवून तिला आलिंगून )

**ये अतां मुलि जिवास जीव दे,**
**ही कथा तुझिच सर्वदा वदे;**
**अंगकें[4] तुहिनशीतलें[5] मला**
**भेट दे, अणि तुझी सखी, हिला. १**

**माधव—**मित्रा मकरंदा, ह्या मालतीची भेट झाली, ह्मणून आतां ह्या लोकांत राहण्याची गोडी वाटते.

**मकरंद—**( हर्षानें ) मित्रा माधवा, खरें, तूं ह्मणतोस तें खरें आहे.

**मदयंतिका—**
**लवंगिका—** सखी मालती, तुझी पुन्हा भेट होईल अशी आशा देखील आह्मांला नव्हती ! आतां तूं भेटलीस, ही मोठी आनंदाची गोष्ट झाली. ये आतां आह्मांला कडकडून भेट.

---

१ प्रातःकाळीं. २ कमलावर. ३ अग्निपातानें. ४ कोमल अंगानें. ५ बर्फासारख्या शीतलानें.

**मालती**—हर हर, प्रियसखींनो, मजबद्दल तुह्मांला फार दुःख झालें. आज तुमची भेट झाली हा सुदिन उगवला. ( दोघी सखींस कडकडून आलिंगिते. )

**कामंदकी**—वत्सांनों, कायरे आहे हें ?

**माधव**—
**मकरंद**— } भगवति, सर्व त्या योगिनीचा प्रसाद आहे.

**कपालकुंडलेची कोपगती होतां, आह्मांवरी विपत्ती**
**आली; परंतु तिची निवृत्ती केली, ह्याच योगिनीनें.** १

**कामंदकी**—हां हां, असें काय ? त्या दुष्टा अघोरघंटाचा वध केल्यामुळें एवढा अनर्थ झाला का ?

**मदयंतिका**—लवंगिके, अग काय हा चमत्कार ! दैवानें केवढ्या अनर्थांत घातलें होतें आपल्याला ! परंतु त्याचा परिणाम चांगला झाला, एवढें बरें झालें.

( इतक्यांत सौदामिनी येते. )

**सौदामिनी**—( पुढें होऊन ) भगवति कामंदकी, मी आपली फारां दिवसांची शिष्यीण, आपल्याला प्रणाम करितें.

**कामंदकी**—कोण ? सौदामिनी !

**माधव**—
**मकरंद**— } ( विस्मयानें ) भगवती कामंदकीची आवडती पट्टशिष्यीण सौदामिनी ह्मणतात, ती ही काय ? हां हां, तर मग जें झालें, तें सर्व आतां जुळतें.

**कामंदकी**—

**ये गे, ये गे, भूरिवसूला प्राणदान तूं केलें,**
**त्या योगानें, हे सौदामिनि ! बहुत सुकृत तुज झालें,** १
**बहुतां दिवशीं दृष्टिस पडलिस, कुशल तुझें मज सांग**
**पुरे पुरे, किति नमस्कार तूं करिशिल हे साष्टांग[1] !** २

**आहेस तूं त्रिजगतांसहि वंद्य[2], सिद्धि**
**तूझी पराभिलषणीय[3], अशि प्रसिद्धि**
**आहे; तुझें न कळतें करणें, फलातें**
**साधूनि दाविशि कृती अपुली परातें.** १

---

१ अष्टांगसहित. २ वंदावयास योग्य. ३ दुसऱ्यांनीं इच्छायाजोगी.

**मदयंतिका—**
**लवंगिका —** } हीच काय ती सौदामिनी ?

**मालती**—होय, हीच ती. हिच्यावर भगवती कामंदकीचा पराकाष्ठेचा लोभ आहे. हिनेंच त्या कपालकुंडलेचा धिक्कार करून मला आपल्या घरीं नेऊन माझा संभाळ भगवतीप्रमाणें केला; आणि इकडे येऊन प्राणनाथानें गुंफलेल्या बकुलपुष्पांच्या माळेची खूण दाखवून सर्वांचे प्राण वांचविले, ती ही बायांनों, आपणा सर्वांस जीवदान देणारी सौदामिनी !

**मदयंतिका—**
**लवंगिका—** } आह्मांवर ह्या कनिष्ठ भगवतीचा हा मोठा उपकार झाला.

**माधव—**
**मकरंद—** } कायहो हा चमत्कार !

**चिंतन करितां देतो चिंतामणि चिंतितार्थ परि तीनें**
**असमत्कार्य अचिंतित केलें, त्या धाकट्या भगवतीनें. १**

**सौदामिनी**—(स्वगत) ह्यांचें हें सौजन्य मला फारच लाजवितें. कारण, मीं ह्यांचें मोठेंसें कार्य केलें असें नसून, हे मला केवढा थोरपणा देतात. (उघड कामंदकीस) भगवति, नंदनासहवर्तमान हर्षयुक्त होऊन पद्मावतीच्या राजानें भूरिवसूच्या समक्ष लिहून हें पत्र माधवास पाठविलें आहे, हें घ्या.

(पत्र कामंदकीच्या हातीं देते.)

**कामंदकी**—(पत्र घेऊन वाचते.) इकडील सर्व वर्तमान यथास्थित असे, विशेष. महाराजांची तुह्माला अशी आज्ञा आहे, कीं—

**तूं श्लाघ्यान्वय होस, मुक्त असशी दुःखांतुनी, माधवा !**
**जांवाई मज लाभलास, ह्मणुनी मी पावलों उद्भवा[१];**
**त्वत्तोषार्थ तुझ्या सख्याप्रति महानंदें करूनी अतां**
**देतों ही मदयंतिका; अनुसरें तूं ह्या मदीया मता. १**

(माधवाला उद्देशून) वत्सा माधवा, हें ऐकिलें ?

**माधव**—ऐकिलें मातोश्री ? आपल्या प्रसादानें सर्व प्रकारें मी कृतार्थ झालों.

**मालती**—मोठी आनंदाची गोष्ट झाली. आतां आमच्या हृदयांतील शंकारूप शल्य नाहींसें झालें.

---

१ हर्ष.

**लवंगिका**—आतां मालतीचे आणि माधवाचे सर्व मनोरथ एकदाच सफल झाले.

**मकरंद**—( पुढें पाहून ) अवलोकिता आणि बुद्धरक्षिता ह्या दोघी कलहंसकास बरोबर घेऊन आनंदानें नाचत नाचत इकडेसच येत आहेत !

( तदनंतर अवलोकिता, बुद्धरक्षिता आणि कलहंस अशीं त्रिवर्ग येतात व अनेक प्रकारांनीं नृत्य करून, पुढें येऊन नमस्कार करून कामंदकीस ह्मणतात ) भगवति कार्यनिधाने, तुझा जयजयकार असो. ( माधवास ) हे आनंददायका पूर्णचंद्रा माधवा, तुझा उत्कर्ष झाला ही मोठी आनंदाची गोष्ट झाली.

( सर्व हर्षानें हास्यवदन होऊन पाहतात. )

**लवंगिका**—जिकडे तिकडे उत्सव चालू झाला आहे. अशा समयीं आनंदानें कोण नाचणार नाहीं बरें ?

**कामंदकी**—असेंच आहे. हें एक विचित्र महा प्रकरण झालें. हें काय झालें आणि कसें झालें हें समजत नाहीं !

**सौदामिनी**—मुख्यत्वेंकरून ह्या प्रसंगीं अमात्य भूरिवसु आणि देवरात ह्यांचे मनोरथ पूर्ण झाले. कारण, दोघांच्या मनांत आपल्या अपत्यांचा परस्पर संबंध व्हावा असें होतें, त्याप्रमाणें झालें, हें फार चांगलें झालें.

**मालती**—( स्वगत ) कनिष्ठ भगवती काय ह्मणते हें ?

**माधव**— } ( विस्मयानें ) भगवति, अमात्य भूरिवसूच्या इच्छेविरुद्ध गोष्ट
**मकरंद**— } झाली असतां, आर्या सौदामिनी असें काय ह्मणते ?

**लवंगिका**—( एकीकडे वळून ) भगवति आतां काय उत्तर द्यावें.

**कामंदकी**—( स्वगत ) नंदनाची बहीण मदयंतिका माधवाच्या मित्रास मिळाली, ह्यामुळें आतां आपणास त्यापासून भय राहिलें नाहीं. ( उघड ) वत्सांनों, सौदामिनी ह्मणते तें खरें आहे. कारण, गुरुगृहीं विद्याभ्यास करित असतां, आमच्या आणि सौदामिनीच्या समक्ष भूरिवसु आणि देवरात ह्यांची आपण उभयतां अपत्यसंबंधानें व्याही होऊं, अशी प्रतिज्ञा झाली होती. त्याप्रमाणें ही गोष्ट घडली. आतां मीं जी मसलत केली, तिचें कारण इतकेंच कीं, राजाचा भूरिवसूवर कोप होऊं नये.

**मालती**—कायहो ही खोल मसलत !

**माधव—**
**मकरंद—** वाहवा, काय हा चमत्कार ! मोठ्यांच्या मसलती अशा खोल असतात, त्या सामान्य माणसांच्या काय ध्यानांत येणार आहेत.

**कामंदकी**—वत्सा माधवा,

**त्वत्कल्याण घडो ह्मणूनि झटलें मी आणि सौदामिनी[1],**
**तैशी ही अवलोकिताहि[2] झटली, प्राप्ता तुला कामिनी[3]**
**झाली ही, तुझिया सख्यास[4] रमणी[5], राजा अणी नंदन**
**झाले तुष्ट; अणीक काय करुं मी तूझें मनोनंदन[6] ! १**

**माधव**—( हर्षानें कामंदकीस प्रणाम करून ) भगवति, ह्याहून आणीक आमचें प्रिय तें कोणतें कर्तव्य राहिलें आहे ? तथापि आमचें आणखी प्रिय करावें असें आपल्या मनांत असल्यास आपल्या प्रसादानें असें असो.

**संतांचें पुण्य वाढो, अणिक सकळही पाप पावो लयातें[7],**
**पृथ्वी पाळोत राजे सतत धरुनियां राजकीया नयातें[8],**
**काळीं[9] देवोत वृष्टी जलदं[10], जन सदा साधुसच्छास्त्रसंगें[11],**
**संपत्संतानलाभें[12] अतिमुदित[13] असो, सत्कथांच्या[14] प्रसंगें. १**

**कामंदकी**—वत्सा माधवा, तूं इच्छितोस तसें घडो, हा माझा तुला आशीर्वाद आहे.

[ सर्व जातात.

**[ दहावा अंक समाप्त. ]**


समाप्त.

---

१ कामंदकीची शिष्यीण. २ कामंदकीची दुसरी शिष्यीण. ३ सुंदर स्त्री. ४ मकरंदास. ५ मनोरम स्त्री. ६ मनास आनंद देणारें प्रिय. ७ नाशातें. ८ राजकीय नीतीनें. ९ यथाकाळीं. १० मेघ. ११ साधु आणि उत्तम शास्त्र ह्यांच्या सहवासानें. १२ संतति संपत्ति ह्यांच्या लाभानें. १३ अत्यंत हर्षित जन असो. १४ उत्तम कथांच्या.